# चिकित्सा–प्रभाकर

प्रकरण ३२ वें.

## ज्व र.

ग्रंथकार

प्रभाकर बाळाजी ओगले

शके १८४७.



किंमत १२ आणे



...टींतून घ्यावें इतरांत कळकतें.

# सूचना.

१ औषधें ताजीं घ्यावीं; जुनीं, किडकीं घेऊं नयेत.

२ एकादें औषध न मिळाल्यास त्यासमान गुणाचें दुसरें औषध घेऊन काम चालवावें. ( औषधि प्रतिनिधींची दुसऱ्या भागांतील यादी पहा. ) पुष्कळ औषधांच्या यादींतून एकादें गौण औषध न मिळाल्यास सोडून द्यावें. तेवढ्याकरितां औषधि करण्याचें सोडूं नये. पण रसायनी औषधांत मात्र हे चालावयाचे नाहीं.

३ एकादि औषधि एकाद्या प्रदेशांत न मिळाल्यास आपल्या प्रदेशांत मिळणाऱ्या तत्समान गुणाची औषधि घेऊन काम चालवावें.

४ जें औषध किंवा वनस्पति माहीत नसल्यास चांगल्या माहितगारांकडून समजून घ्यावी.

५ औषधें काळजीपूर्वक करावीं. औषधें नीट तपासून घ्यावीं. प्रमाणाबाहेर घेऊं नयेत. औषधें करण्यांत स्वच्छता राखावी.

६ ज्या औषधि पानें, साली, मुळें, फुलें, फळें हीं बागांत, शेतांत, रानांत, माळावर, कुंपांत, परसांत वगैरे ठिकाणीं व डोंगरांत मिळण्यासारख्या असतील त्या प्रयत्नें करून आणाव्या आणि न मिळणाऱ्या मात्र दुकानांतून नीट ओळखून घ्याव्या. ताज्या औषधांचा गुण लवकर व उत्तम येतो.

७ जेथें प्रत्येक औषधि किती घ्याव्या हें सांगितलें नसेल तेथें समभाग घ्याव्या.

८ चूर्ण सांगितलें असल तेथें वस्त्रगाळ चूर्ण करावें.

९ काढा करण्यास मातीचें भांडें ( गाडगें, मडकें ) घ्यावें हें उत्तम. न मिळाल्यास कल्हईचें घ्यावें. काढा शिजवितांना भांड्याचें तोंड उघडें ठेवावें. व आपणांस पाहिजे त्यापेक्षां थोडा अधिक उरतांच भांडें चुलीवरून उतरावें. म्हणजे आंतील काढा निवेपर्यंत बेताचा आटून रहातो.

१० काढ्यांत मध घालावयाचा असल्यास निवाल्यावर घालावा. ऊन असतांना घातल्यास विरुद्ध होतो. काढ्याचें प्रमाण तान्ह्या मुलांस एक तोळा, २ पासून ५ वर्षांचे मुलांस २ किंवा २॥ तोळे. ६ पासून १२ वर्षांपर्यंत ३ तोळे. पुढें ४ पासून ५ तोळे प्रमाण ठेवावें.

११ औषधाचें प्रमाण बहुत करून मोठ्या माणसाचें लिहिलेलें असतें. लहान मुलांस अथवा अशक्तांस प्रकृतिमान व कमीजास्त बलाबल पाहून औषध द्यावें.

१२ एकादें औषध अनुपान किंवा त्यांतील एकादा जिन्नस रोग्यास न आवडल्यास अथवा शिसारी बसली असल्यास बदलून तत्समान गुणांचें दुसरें औषध किंवा अनुपान योजावें. सक्ती करूं नये. कारण सक्तीनें दिलेलें औषध हितावह होत नाहीं.

१३ औषध रुप्याच्या किंवा कांचेच्या किंवा कल्हई केलेल्या वाटींतून द्यावें इतरांत कळकतें किंवा बिघडतें.

१४ काढ्यांत औषधें घालणें तीं साधारण कुटून घालावी. वयमानाप्रमाणें १ पासून ३ तोळ्यापर्यंत सर्व औषधांचें मिळून प्रमाण असावें. जेवढा काढा पाहिजे असेल त्याच्या ८ पट पाणी घालावें आणि मंदाग्नि वर आटवावा. अथवा दुसरें प्रमाण पाहिजे असल्यास तसेंही करावें. म्हणजे चौपट, तिप्पट, दुप्पट वगैरे सांगितल्याप्रमाणें पाणी घालावें.

१५ पथ्य सांगितलें असेल तेथें तसेंच करावें. नसेल तेथें साधारण करावें. वावडे पदार्थ व जें औषध घतलें असेल त्याच्या विरुद्ध गुणांचे पदार्थ, किंवा औषधांचें वीर्य कमी करणारे पदार्थ सेवन करूं नयेत.

१६ औषधांचा खल करण्यास दगडी खलबत्ता वापरावा, किंवा चिनीमीताचा किंवा थोडें खलण्यास काचेचा वापरावा.

१७ पुरुषापेक्षां स्त्रियांस औषधाचें प्रमाण थोडें कमी द्यावें. मुलांस व गर्भिणी स्त्रियांस कडक उष्ण वीर्याचीं व तीक्ष्ण रेचक, किंवा वांतिकारक औषधें किंवा गर्भास विघातक औषधें देऊं नयेत.

१८ वजनें, मापें, तराजू, खलबत्ते, भांडी, गाळणी, फडकीं, पळया, चमचे, वाट्या, हीं नेहमीं स्वच्छ ठेवावीं. व काम होतांच घासून स्वच्छ करावीं. एका औषधाचे भांडें स्वच्छ केल्याशिवाय त्यांत दुसरें औषध घालूं नये.

१९ ज्या औषधाच्या पाठांत औषधे घेण्याची किंवा लावण्याची मुदत सांगितली नसेल तेथें रोग बरा होईपर्यंत द्यावें किंवा लावावें. मुदत सांगितली असल्यास मुदती प्रमाणें करावें.

२० घरांत औषधें ठेवणें तीं जपून ठेवावीं. मुलांच्या किंवा इतरांच्या हातीं लागूं देऊं नयेत.

२१ लहान मुलांस व गर्भिणीस पारा, गंधक, सोमल, जेपाळ, किंवा तीव्र भस्में मिश्रीत रसायणीं औषधें बिलकूल देऊं नयेत. होतां होईल तों सौम्य औषधें द्यावीं.

२२ अलीकडे चवल्या, पावल्या, अधेल्या, आणेल्या निकल धातूंच्या निघाल्या आहेत. पूर्वीच्या कित्येक ग्रंथांत औषध घेण्याच्या किंवा करण्याच्या प्रमाणांत चवली, पावली वगैरेंचा प्रमाणें सांगितलीं आहेत. तेथें जुन्या रुप्याच्या नाण्याच्या चवल्या, पावल्या, अधेल्या समजाव्या. निकलच्या घेऊं नयेत. कारण त्या वजनानें जास्त आहेत.

२३ रोग्यास काळजीपूर्वक तपासावा, गोडबोलावें, ममतेनें वागावें, धीर द्यावा. त्याचे शेजारीं त्यास ऐकूं येईल असे कुजबुजूं नये. संदिग्ध भाषण करूं नये, व मरण सांगूं नये.

---

# अनुक्रमणिका

## ज्वरप्रकरण

# प्रस्तावना.

चिकित्सा प्रभाकर यानांवाचें मोठें वैद्यकावरील पुस्तक सर्वांच्या उपयोगाकरितां केलें आहे. त्यांत लहान मोठ्या सर्व रोगांचीं लक्षणें, त्यांवरील इतर उपचार व औषधेंहीं रोगांच्या उपांगाच्या जवळ जेथल्यातेथे लिहलीं आहेत. त्यावरून रोग निवारणाच्या कामीं चांगला उपयोग होईल. परंतु तो ग्रंथ मोठा असल्यामुळें व त्या मानानें किंमत जास्त असल्यामुळें सर्व साधारण लोकांस घेणेस सोपें पडावें ह्मणून त्यांतील हें ज्वर प्रकरण निराळें छापिलें आहे.

सर्व रोगांत ज्वरा सारखा शीघ्र प्राणघातक दुसरा रोग नाहीं. मोठमोठ्या कसलेल्या वैद्यांस व डॉक्टरांसही ज्वर परिक्षेचे कामीं कशी भूल पडते, हें सर्व श्रुत आहेच. करितां त्याजवर योग्य वेळीं योग्य उपाय न झाल्यास ज्वर विकोपास जाऊन असाध्य होतो, व मृत्युही येतो. यापुस्तकांत सर्व प्रकारचे ज्वर व त्यांचीं अंगें, उपांगें व त्या प्रत्येकावर निरनिराळे अनेक अनुभविक उपाय दिले आहेत. तसेंच सांथीचेरोग व प्लेग व इतर जंतुजन्य ज्वर, हवा पालटल्यामुळें झालेले ज्वर, व इतर क्षुल्लक कारणानें झालेले ज्वर वगैरेचींही लक्षणें आणि त्यावरील उपचार यथायोग्य दिले आहेत. प्लेगाबद्दलची योग्य कारणें, पूर्वेतिहास व पूर्वी चालत असलेले उपाय यांची यथासांग शक्यतितकी माहिती मिळवून लिहिली आहे, व अनुभविक उपाय लिहिले आहेत. तसेंच ज्वर गेल्याचीं लक्षणें, ज्वर गेल्यानंतर कसें वागावें व शक्ति येण्यास काय उपाय करावें वगैरे खुलासेवार माहिती सर्वमान्य अशी दिली आहे; आणि ज्वरांत होणाऱ्या इतर उपद्रवांवर त्यांचीं लक्षणें व औषधें त्या त्या जागीं दिलीं आहेत. प्रत्येक कुटुंबांत हें पुस्तक बाळगून त्याचा कारणपरत्वें उपयोग करून घेण्यास सुलभ पडावें ह्मणून पुस्तकाची भाषा सर्वांस समजेल अशी सोपी लिहिली आहे. करितां प्रत्येक कुटुंब वत्सलांनीं हें पुस्तक जरूर ठेवावें. याप्रमाणेंच बालरोग, स्त्रीरोग हीं प्रकरणेंही निराळी छापलीं आहेत. त्यांचाही उपयोग वरील प्रमाणें चांगला होईल अशी खात्री आहे.

**ओगलेवाडी.**
मिति कार्तिक वद्य ८ शके १८४६ } **प्रभाकर बाळाजी ओगले.**

# शरीराचें उष्णता मापक यंत्र.

## ( थर्मामिटर )

शरीराची उष्णता ज्या यंत्रानें मोजतां येते त्या यंत्रास थरमामिटर ह्मणजे उष्णता मापक यंत्र ह्मणतात. ज्वर तपासण्याच्या कामीं ह्याचा उपयोग फार होतो पहिल्यानें ज्वरी मनुष्याच्या अंगांतील उष्णता मोजून पहावी. हें यंत्र ह्मणजे एका कांचेच्या नळींत पारा घातलेला असून तोंड बंद केलेलें असतें. ( सोबतचीं चित्रें पहा ) व त्या नळींत आणखी एक केशाकृति नळी असते. पाऱ्याचा धर्म असा आहे कीं त्यास उष्णता अगदीं सहन होत नाहीं यामुळें किंचितही उष्णता लागतांच तो आंतल्या केशाकृती नळींत शिरून वर जाऊं लागतो.



त्या नळीवर दुसरी नळी बसविली असते ती वर उष्णता किती आहे हे दर्शविण्या करितां अंश मांडलेले असतात. त्या योगानें शरीरांत उष्णता किती आहे हें समजून येतें. हे उष्णता दर्शविणारे अंक ९५ पासून ११० पर्यंत असतात. कारण त्यापेक्षां शरीराचें उष्णतामान कमी जास्त होतनाहीं. या अंशाचे पोटभाग दर्शविण्या करितां एका अंशा पासून पुढील अंशा पर्यंत पांच रेघा दाखविल्या असतात. प्रत्येक २ पोट भागा बद्दल एक रेघ असते. आकृतिमध्यें दर्शक ९६ पर्यंत चढलेला आहे त्याठिकाणीं तिरा सारखी खूण केलेली आहे. ही शरीराची स्वाभाविक उष्णता दर्शविते.

ही स्वाभाविक उष्णता कांहीं विशेष कारणा वाचून कमी जास्त होत नाहीं ९६ अंशावर असणारा दर्शक जर १०० पर्यंत जाऊन थांबला असतां, तर १०० अंश उष्णता आहे असें समजावें यांप्रमाणें पारा जसा कमी जास्त अंशा पर्यंत चढेल, तितकी उष्णता शरीराची आहे असें समजावें.



इंग्रेजींत हीं उष्णता मापक यंत्रें २ प्रकारची असतात. एक सेंटिग्रेट व दुसरे फॅरनहीट. ज्वर वगैरीचो उष्णता समजून घेण्यास फॅरनहीट ह्या पद्धतीचाच उपयोग करितात. आरोग्यावस्थेंत शरीराची उष्णता ९८·६ इतकी ठरलेली आहे पण कित्येक वेळां ९७ पर्यंतही उतरते. व ९९ पर्यंतही चढते. कित्येक रोगांत तें फारच कमी असतें. महामारींत तें ८०-७५ पर्यंत उतरते. कृत्रिम रीत्या हें कमजास्त करतां येईल. एकंदरींत ९९ पेक्षां जास्त शरीराची उष्णता असली ह्मणजे ज्वर आहे असें समजावें. व ९७ पेक्षां कमी

असल्यास जिवास धोका आहे असे समजावें. पण कित्येक वेळां ९५ ही पहाण्यांत येते. बहुत करून प्रत्येक उष्णता मापक यंत्रावर तें यंत्र किती मिनीटें लावावें हें लिहिलेलें असतें. ज्या यंत्रावर असें लिहिलें नसेल तें पांच मिनिटें लावावें यंत्रावर लिहिलेल्या मिनिटा पेक्षां आपण एक किंवा दीड मिनिट जास्त लावावें. जास्त लावल्यानें पारा कांहीं जास्त चढत नाहीं. कारण उष्णतेच्या परमावधी पेक्षां पारा जास्त चढणें शक्य नाहीं हे ध्यानांत असावें

शरीराची उष्णता ४ ठिकाणीं घेतां येते–खाकेंत, तोंडांत, जांघेत, व गुदांत, तरी खाकेंतच घेण्याचा फार प्रघात आहे. खाके पेक्षां तोंडांतील उष्णतेचें मान साधारण एक द्वितांश डिग्रीनें जास्त असते. गुदद्वारांत याही पेक्षां जास्त असतें. वय दिवसाच्या वेळां, व्यायाम, ऋतुमान, हवा, आणि अन्न इत्यादिहीं शरीराची उष्णता कमी जास्त करण्यास कारणीभूत होतात. थोरां पेक्षां लहान मुलांची उष्णता १ अंशानें जास्त असते. भरज्वानींत ती कमी होते. व पुन्हा वार्धक्यांतही ती जास्त होते. नुकत्याच जन्मास आलेल्या बालकाची जर उष्णता घेतली तर मोठ्या माणसां पेक्षां ती एक अंशानेंतरी जास्त असते व त्याप्रमाणें वार्धक्यांत वाढते. पुरुषा पेक्षां स्त्रियांची उष्णता जास्त असते. सकाळीं ९ वाजल्या पासून ते सायंकाळीं ४ वाजे पर्यंत शरीराचें उष्णतामान वाढत असतें, रात्रीं बारा वाजे पर्यंत तें कमी होऊन, सुमारें पहाटेस ३।४ वाजे पर्यंत तसेंच कायम राहते. सकाळच्या व दोनप्रहरच्या वेळांत एक दीड अंशाचा फेर होतो. अगदीं कमी शरीराची उष्णता पहाटे ३ वाजतां व सायंकाळीं ३ वाजतां असते. शारीरिक मेहनतीचे व्यवसाय चालू असतील त्यावेळीं उष्णतामान जास्त असते. चहा, काफी, मद्य इत्यादिकां सारखी उत्तेजक पेयें व कांहीं प्रकारचें अन्न हीं शरीराची उष्णता वाढविण्यास कारण होतात.

थरमामिटर अजाऱ्यास लावण्यापूर्वी, थरमामिटरची पारा असलेली बाजू खालीं करून तें हातांत धरावें व अगदीं हळू झाडावें; म्हणजे दर्शकपारा वर चढलेला असल्यास खालीं स्वस्थानीं येतो. तो ९६ अंशावर आला असें पाहून पारा असलेली बाजू खाकेंत देऊन अथवा ज्या ठिकाणीं लावण्याची असेल त्या-ठिकाणीं देऊन त्या यंत्राच्या ठराविक मिनीटापर्यंत (अमुक यंत्र मिनिटें लावावें असें ठरलेलें असतें.) त्या-ठिकाणीं तें ठेवावें. यंत्राचा ठरलेला वेळ झाल्यावर तें बाहेर काढून पहावें. जर तें लावण्यापूर्वी होतें तितकेंच राहिलें म्हणजे लावण्यापूर्वी पारा ९६ अंशावर होता व काढल्या नंतरही त्याचजागीं तो असला तर थरमामिटर चांगलें लावलें गेलें नाहीं असें समजावें. कित्येक वेळां शरीरावर रासायनिक व्यापार घडल्यानें क्रोधाच्या संतापानेंही उष्णतामान जास्त कमी होण्याचा संभव असतो हें लक्षांत असावें.

कित्येक वेळां थरमामिटर खाकेंत लावते वेळीं पाऱ्याचा भाग खाकेंत बरोबर न बसतां अंगांतील कपड्यावर अथवा खाकेच्या बाहेर लागण्याचा संभव असतो. यामुळें कित्येक वेळां उष्णतामान बरोबर समजत नाहीं. त्याच प्रमाणें खाकेंत घामाच्या योगानें ओलावा आला असल्यास तो साफ पुसून काढून नंतर लावावें. असें न केल्यास उष्णतामान बरोबर समजणार नाहीं. तें लावण्यापूर्वी अजाऱ्यास स्वस्त पडून राहण्यास सांगावें व तें लावल्या नंतर त्या बाजूच्या दंडावर दाबून धरावें. म्हणजे थरमामिटर ढिला न राहतां योग्य उष्णता दाखवील, व शिवाय यापासून खालीं पडून फुटलें जाणार नाहीं.

थरमामिटर तोंडांत धरून पहावयाचें असल्यास स्वच्छ धुऊन पुसून घ्यावें, व नंतर तोंडांत जिभेखालीं धरण्यास सांगावें; दांताखालीं न धरितां ओठानें दाबून धरण्यास सांगावें, व ठराविक वेळीं बाहेर काढावें.

कित्येक उष्णता दर्शक यंत्रे इतकीं नाजूक असतात कीं, तीं खाकेंतून अगर तोंडांतून बाहेर काढून उभीं धरतांच आंतील चढलेला पारा एकदम खालीं येतो त्यामुळें उष्णता बरोबर समजत नाहीं. यासाठीं

यंत्र खाकेंतून अगर तोंडांतून काढतांच आडवें धरून तपासावें, म्हणजे दर्शक ( पारा ) खाली येणार नाहीं. पण जीं उत्तमांतलीं असतात तीं कशींही धरली तरी फेर फार होत नाहीं. प्रत्येक खेपेस यंत्र धुऊन पुसल्या शिवाय दुसऱ्यास लावूं नये. तें रसकापुराच्या पाण्यानें धुवावें म्हणजे रोग्याच्या अंगांतील सूक्ष्म जंतु त्यास लागले असल्यास मरतात.

तान्ह्या मुलांस जांगाडांत लावावें. कारण त्याचे पाय आयतेच उचललेले असतात.

गुदद्वारांत लावण्याचा प्रसंग सहसा येत नाहीं. तथापि रोगी अस्ताव्यस्त असून हाल चालीमुळें यंत्र लावण्यास अशक्य झाल्यास अथवा तोंडांत धरण्यास अशक्य ( वायुवगैरे मुळें किंवा ज्वरांतच मुखरोग झाल्यामुळें ) झाल्यास निरूपायास्तव गुदांत लावावें.

या शिवाय हाताची नाडी पाहून ज्वर ठरविण्याची जुनी पद्धति आहे. विज्ञविषयीं आष्ट विश्व परिक्षेत **नाडीपरीक्षा** दिली आहे. ती वरून ज्वर परीक्षा करावी.

———:0:———

# चिकित्सा प्रभाकर.

## ज्वर.

### ज्वर उत्पन्न होण्याचें कारण.

अति पाणी पिणें, अकालीं खाणें, अति खाणें, शिळें अन्न खाणें, किंवा शिळें व ताजें अन्न मिसळून खाणें, दिवसा निजणें, रात्रीं जागणें, मलमुत्रांचा वेग धारण करणें, फार श्रम, फार संताप, भय, चिंता वगैरे मनोविकार, इत्यादि कारणांनीं ज्वर उत्पन्न होतो.

सर्व रोगांत ज्वर हा मोठा श्रेष्ठ रोग असून तसाच मोठा दुष्ट व घातक आहे. इतर रोगांपेक्षां या रोगानें मनुष्यें जास्त मरतात. हा मनुष्याचें ओज ( सर्व धातूंचें तेज ) भक्षण करितो. हा उत्पन्न झाल्यापासून अखेरपर्यंत मोठमोठ्या कुशल वैद्यांसही मोहांत पाडितो. नामांकित वैद्यही ज्वर परिक्षेच्या कामांत गोंधळून जातात. हा भयंकर रोग अनेक कारणांनीं त्वरित उत्पन्न होतो, व निरनिराळ्या स्वरूपांत निरनिराळीं नांवें पावतो. याचे मुख्य भेद आठ आहेत. ते—१ वात, १ पित्त, १ कफ, ३ द्वंद्वज, १ सन्निपात, १ आगंतुक. एकूण ८ झालें. परंतु पोट भेदांनीं त्यांचे अनेक प्रकार होतात. ते पुढें दिले आहेत.

### ज्वराचें सामान्य लक्षण.

घामाचा प्रतिबंध, ( पण पित्त ज्वरांत व शीत ज्वरांत म्हणजे हिंव ज्वरांत मात्र घाम येतो ) देह, इंद्रियें, मन यांस अस्वस्थता, संताप, अंगास जडत्व, वेदना, हीं सर्व किंवा कांहीं एकेच काळीं होतात. तोंडास रुचि नसणें, अन्नावर वासना नसते, शौचास होत नाहीं, किंवा ढाळच होतात. अंग मोडून येतें. गात्रें शक्तीहीन होतात. झोंप येते किंवा मुळींच येत नाहीं. अपथ्य पदार्थांवर वासना जाते. आप्त इष्टांचा व मुलांचा तिरस्कार, कारणावांचून शब्द, अग्नि, थंडी, वारा, पाणी, ऊन, सावली यांचा तिरस्कार होतो, किंवा इच्छा तरी होते. शिवाय असंतोष इत्यादि लक्षणेंही होतात.

### शास्त्रार्थ.

वाग्भट सूत्रस्थान—आत्रेयादि महाऋर्षीनीं असें सांगितलें आहे कीं, आमाशयस्थ दोष अग्नि मंद करून आमाशीं मिश्र होऊन व स्रोतसांचा ( मार्गांचा ) अवरोध करून ज्वर उत्पन्न करितात. यास्तव ज्वराचीं पूर्व रूपें दिसूं लागतांच किंवा ज्वर सुरूं होतांच शक्ति क्षीण न होऊं देण्याविषयीं तत्पर राहून लंघन करावें. कारण शक्ति हाच आरोग्याचा पाया आहे व आरोग्य हेंच चिकित्सेचें प्रयोजन होय. लंघनानें दोष क्षीण, अग्नि प्रदिप्त, व देह हलका झाला म्हणजे स्वस्थता, क्षुधा, तृषा, अन्नावर इच्छा, पचन शक्ति, बल व ओज हीं उत्पन्न होतात.

---

### १ लंघनाचा नियम.

चिंतामणी निघटांत—लंघन हें वात, पित्त, कफ, यांस यथाक्रमानें जाणावें. अगदीं न खाणें, लघु भोजन करणें, उष्णोदक प्राशन करणें, असे ३ प्रकारचें लंघन सांगितलें आहे. लंघन हें सर्व औषधांहून श्रेष्ठ आहे.

भेषज रत्नावलींत--सन्निपात ज्वरांत आरोग्य होण्याकरितां ३।५ अथवा १० दिवस लंघन करावें असें सांगितलें आहे. पण *सामज्वरांत लंघन कडकडीत करावें. निराम ज्वरांत करूं नये, केल्यास मध्यम करावें. क्षयांतील तापास लंघन मुळींच करूं नये. ज्वरांत दूध वर्ज सांगितलें आहे, पण क्षय रोग्यास देण्यास हरकत नाहीं; कारण त्याचा निराम ज्वर असतो. त्याच प्रमाणें अन्यमतें सर्वच ज्वरांत लंघन करावेंच असें नाहीं नुसता वात ज्वर पित्त ज्वर, धातुक्षयात्मक ज्वर, आगंतुक ज्वर, जीर्ण ज्वर, भय ज्वर, क्रोध ज्वर काम ज्वर, दृष्टि ज्वर, श्रम ज्वर, रक्तक्षय ज्वर, आघांत ज्वर यांत लंघन करूं नये. यांस त्या त्या दोषांच्या कारणांचा शमनोपायच हितावह होय.

आर्य वैद्यकांत लंघनाच्या दिवसांचे गुणधर्म खालीं लिहिले प्रमाणें आहेत.

१ दिवसाचें लंघन केल्यास--आमनाश व अपचन जातात.
२ ,, ,, ,, --पित्त नाहींसे होतें.
३ ,, ,, ,, --कफ कमी होतो.
४ ,, ,, ,, --वाताचा जोर कमी होतो.
५ ,, ,, ,, --भूक फार लागूं लागते.
६ ,, ,, ,, --सर्व अवयव उत्साहित होतात
७ ,, ,, ,, --ज्वराचें यथायोग्य पचन होतें
८ ,, ,, ,, --ज्वर नाहींसा होतो.
९ ,, ,, ,, --सर्व दोष शमतात.

## अति लंघनाचा निषेध.

अति लंघन केल्यास-अतिशय कृशता, खोकला, फार तहान, अरुचि, स्निग्धता, अग्नि, निद्रा, दृष्टि, श्रवणशक्ती, वीर्य, ओज, भूक, व ज्वर यांचा क्षय होतो. आणि बस्ति, हृदय डोकें, पोटऱ्या, मांड्या माकडहाड व बरगड्या, यांत दुखणें ही होतात, ताप, बडबड, अर्धांग वात, ग्लानि, उलटी, पेरें व हाडें फुटणें, मलमूत्रादिकांचा अवरोध वगैरे विकार होतात.

दोषांच्या निरनिराळ्या भेदांमुळें, चिकित्सेचेंही ग्राही, भेदी, इत्यादि अनेक प्रकार होतात. असे दोषांचे कितीही भेद झाले तरी रोग साम व निराम या दोन भेदास सोडून रहात नाहींत. या प्रमाणेंच चिकित्सेचें कितीही दोष असले तरी त्या सर्वांच्या **लंघन व बृंहण** या दोन मुख्य प्रकारांतच अंतर्भाव होतो.

लंघनाचे प्रकार--अन्नपान कांहींच न घेणें, नुसते ऊन किंवा थंड पाणी पिणें, लघु पण तोही अल्पाहार करणें, नुसती फळें खाऊन राहणें, एकभुक्त राहणें, नुसतें पातळ पदार्थ किंवा दुध किंवा ताकावरच राहणें इत्यादि हें लंघन दोषांचा विचार करून योजावें



## २ ज्वरी रोग्याची जोपासना.

जें औषध दोषांना बाहेर काढून न टाकता व समदोषांना विकृत न करितां, विषम दोषांना सम स्थितींत आणितें त्याला शमन म्हणतात. ते ७ प्रकारचे आहेत पाचन, दीपन, निराहार, पाणी न पिणें, व्यायाम करणें, शेक किंवा उन्हांत बसणें, व वारा घेणें. याचप्रमाणें शोधनाचे ५ प्रकार आहेत. बस्ति, वमन, विरेचन, रक्तमोक्ष, ऊर्ध्व विरेचन, ज्या ज्वरास लंघन योग्य आहे त्यास लंघन चांगलें झालें म्हणजे इंद्रियांची प्रसन्नता, मल होणें, देह, लाघव, रुचि, क्षुधा, व तृषा यांचा एकवेळीं प्रादुर्भाव, हृदय, कंठ, व ढेंकर यांची शुद्धि, व्याधि मार्दव, मनाला उत्साह, व तंद्रेचा नाश. इतके

* साम ज्वर म्हणजे आमदोष युक्त ज्वर. निराम ज्वर म्हणजे आमदोष रहित ज्वर.

प्रकार उत्पन्न झाले म्हणजे पुढें ६ दिवस किंवा ज्वर कमी होईपर्यंत औषधांनीं सिद्ध केलेल्या कण्या द्याव्या. त्यांत मंडापासून आरंभ करावा. म्हणजे जठराग्नि प्रदीप्त होतो. १ प्रथम सहज पचणारी अशी साळीच्या लाह्याची कणेरी किंवा तांदूळ भाजून कणेरी करून तींत सुंठ, धणे, सैंधव, पिंपळी ह्याचें चूर्ण पाव तोळा अजमासें घालून द्यावी. रोग्याची आंबटावर वासना गेली असल्यास डाळिंबाचा रस व सैंधव घालून द्यावी. २ ज्वरी मनुष्यास रेच होत असल्यास- किंवा पित्ताधिक्य असल्यास-सुंठ व मध थंड कणेरींत घालून द्यावी. ३ ओटीपोट, कुशी व डोकें दुखत असल्यास-रिंगणी मूळ व गोखरू ह्यांच्या काढ्यानें सिद्ध केलेली पेज द्यावी. ४ ज्वर व अतिसार हे विकार असल्यास-पिठवण, चिकणामूळ, बेलकाचरी, सुंठ, निर्लेकामळ व धणे ह्याच्या काढ्यानें सिद्ध केलेली, दीपन व पाचन होणारी पेज द्यावी. ५ उचकी व वेदना, श्वास व खोकला, हे विकार असल्यास-लघुपंच मुळांच्या काढ्यात सिद्ध केलेली व रोगी कफानें फार पीडित असल्यास मोठ्या-पंच मुळांच्या काढ्यांत सातूचें पीठ घालून सिद्ध केलेली पेज द्यावी. ६ मलावरोध झाला असल्यास-सातू, पिंपळी व आवळकाठी यांनीं सिद्ध करून तुपाची फोडणी देऊन पुरीषादि मळ व वातादि दोष ह्यांचें अनुलोमन करणारी पेज द्यावी. ७ बद्धकोष्ट व मुरडा असेलतर-चवक, पिंपळमूळ व मनुका, आवळ काठी, सुंठ, यांनीं सिद्ध केलेली कणेरी द्यावी. ८ गुदाशी कांतरल्या सारखी पीडा होत असेलतर-बोरें, अम्मूल, सालवण, पिठवण व कोंवळें बेलफळ ह्यांच्या काढ्यांत केलेली कणेरी द्यावी. ९ घाम व झोंप येत नसून तृषेनें व्याकूळ झाला असल्यास-खडीसाखर, आवळकाठी, सुंठ यांनीं तयार केलेला कणेरी द्यावी. १० तहान, वांति, दाह, ज्वर असल्यास-खडीसाखर, मनुका, बोरें, उपळसरी, नागरमोथे, रक्तचंदन यांनीं सिद्ध केलेली कणेरी निवाल्यावर मध घालून द्यावी. ११ मद्य किंवा कैफी पदार्थांपासून उत्पन्न झालेल्या ज्वरास-रोगी, तहान, वांति, व दाह यांनीं पीडित असल्यास व ऊर्ध्वगामी रक्तपित्त झालें असतां पेज देऊं नये. अशावेळीं ज्वर नाशक असा डाळिंब, नारिंग, इत्यादि फळांचा रस काढून किंवा पाण्याबरोबर मधसाखर, साळीच्या लाह्याची तरवणी करून द्यावी. त्यानंतर लाह्यांचें पातळ पीठ किंवा यवागू देऊन जिरल्यावर रोग्यास भूक लागल्यास धान्याचें कढण ( यूष अथवा काट ) किंवा मूग ह्यांचें साधें कालवण भाजलेल्या तांदळाचा भात किंवा कणेरी द्यावी.

औषध जिरण्यापूर्वी जेवण केलें, किंवा खाल्लेलें अन्न जिरण्यापूर्वी जर औषध घेतलें तर तें रोगाचा परिहार न करितां दुसराच एकादा रोग उत्पन्न करितें.



## ३ ज्वरांत ऊन पाण्याचा उपयोग.

वात कफात्मक ज्वरांत तहान लागली असतां थोडें थोडें ऊन पाणी द्यावें. ह्मणजे कफास पातळ करून लवकर तहान कमी करितें व अग्नीप्रदीप्त करून स्रोतसास मऊ करून साफ करितें. तें पाणी स्तब्ध झालेलें, पित्त, वायु, घाम, मल, व मूत्र यांचें अनुलोमन करितें. आणि झोंप, जडत्व, अरुचि ह्यांना दूर करितें १ एक कढ येऊन पिण्यास योग्य झालेलें पाणी प्याल्यानें महा स्रोतसास वरून खालीं जाणारी गति उत्पन्न करितें; त्यामुळें मलोत्सर्जन साफ होतें. २ त्यापासून श्लेष्मल त्वचेंतून वाहणारे व दुसरे निरनिराळे जे चिकट स्राव, कफ, लाळ कोठ्यांतील व आंतड्यांतील द्रव इत्यादि पातळ होऊन त्यांचा चिकट पणाही कमी होतो. ३ त्यापासून आंतील अंग धुतलें जाऊन पित्त, आम, मळ इत्यादि खालीं ढकलले जाऊन कोठा स्वच्छ होऊन पुनः अन्न ग्रहणकरण्यास सिद्ध होतो. ४ त्यापासून पित्त मार्गांतील पित्तही खालीं उतरून मलास पिवळा

रंग येऊन मलाची मूळची असह्य दुर्गंधी कमी होते. ५ त्यापासून रक्तांत किंवा अधिक अथवा आगंतुक क्षाराचे खडे जमलेले असल्यास ते विद्रुत होऊन जातात. ६ त्यापासून मुत्र स्वच्छ होते. ७ कढत पाणी सोसेल तसें प्याल्यानें दरदरून घाम येतो. ८ त्यापासून तर्व स्रावांचें उत्सर्जन चांगलें होतें. ९ आणि थोड्याच वेळांत तृषा कमी होऊन श्लेष्मल त्वचेचा कोरडेपणाही दूर होतो. १० रोग्याच्या मनोविकारांत सुधारणा होऊन त्याचे अंगीं हुषारी येते. ११ पचन क्रिया सुधारते. १२ यांतील तत्व हेंच कीं एक कढ येऊन गेलेलें पाणी निर्दोषें होतें १३ ऊन पाणी प्याल्यानें तृषा कमी होते. १४ मद्यप्यास रोज गरम पाणी पाजीत गेल्यानें त्याची मद्यावरची इच्छा कमी होते ह्मणजे आसक्ती रहात नाहीं. १५ कढत पाणी पिण्यास कटाळा येऊंनये ह्मणून त्यांत सुंठीची पूड, लवंगा, आवा घातल्यास कंटाळा येत नाहीं. १६ मलावरोधाची संवय असणाऱ्यांनीं रात्री सोनामुखीच्या पाल्याची पूड किंवा बाहव्याच्या शेंगेंतील मगज टाकून पाणी प्यावें, ह्मणजे मलशुद्धि चांगली होते. १७ ऊन पाणी रात्रीं प्यावयाचें ते २० तोळे प्यावें. व तें निजते वेळीं व सावकाश प्यावें.

थंड पाण्याचे गूण याच्या उलट आहेत. थंड पाणी दोषांची वृद्धि करितें. ऊन पाणी जरी वरील गुणांनीं युक्त आहे तरी तें पित्त ज्वरांत, पित्ताधिक्य ज्वरांत डोळ्यांतून नाकांतून वगैरे उष्ण वाफा निघणें, दाह, मोह व अतिसार यांनीं युक्तज्वरांत, विष व मद्यापासून उत्पन्न झालेल्या ज्वरात, उरःक्षत, क्षय, रक्तपित्त झालेल्या रोग्यांस देऊं नये. अशा रोग्यांना नागरमोथे, चंदन, सुंठ, वाळा, पित्तपापडा, काळावाळा यांचें चूर्ण घालून सिद्ध केलेलें थंड पाणी हितावह आहे. तें पाचक होऊन ज्वर व तहान यांस दूर करितें.

उष्णता ही पित्तावांचून नाहीं. व ज्वर उष्णतेवांचून नाहीं. ह्मणून कोणत्याही ज्वरांत व विशेषतः पित्तज्वरांत पित्ताला वाढविणारे पदार्थ वर्ज करावें. तसेंच ज्वरांत स्नान, अंगास तेल लावणें, चंदन वगैरेची उटी लावणें व निरर्थक लंघनें हीं वर्ज करावीं.

❁ ❁ ❁ ❁

## ४ दोषांचें परिवर्तन.

एक दोष उत्पन्न झाला ह्मणजे तो दुसऱ्या दोषाला उत्पन्न करितो. व दुसऱ्या दोषानें पहिला दोष जास्त होतो. पहिला वाढला ह्मणजे तो पुन्हा दुसऱ्याला वाढवितो. अशी एक मेकांना मदत होऊन दोन्ही जास्त होतात. अशा परस्पर संबंधाच्या सांखळीला दोषांचें परिवर्तन ह्मणतात. ही सांखळी तोडण्याचा प्रयत्न केला नाहीं तर दोष आधिकाधिक वाढत जातात. या करितां कुशल वैद्यांनीं दोषांचा बारकाईनें काळजी पूर्वक शोध करून दोष असतील ते घालवावें ह्मणजे ज्वराची चिकित्सा करण्यास सोपें पडतें.

रोग्याची शक्ति कमी न होऊं देतां व दोष वाढवूं न देतां ६ दिवस घालवावे. नंतर लंघनादिकांनीं दोषांचा पाक झाला असतां शेष राहिलेल्या दोषांचें पाचन व शमन करण्यास योग्य असा काढा द्यावा पित्तज्वरावर विशेषतः कडू व कफज्वरावर तिखट असा काढा योजावा. तुरट रस जरी पित्त व कफ ज्वरास नाशक आहे; तथापि नवज्वरांत म्हणजे अपक्व किंवा आमज्वरांत तुरट काढा देऊं नये. कारण तो मलावरोध करून विषमावर चालवितो. आणि अरुचि, उम्हासे, उचकी व पोट फुगणें इत्यादि विकार उत्पन्न करितो.

✽ ✽ ✽ ✽

## ५ औषधाची योजना.

कोणी ७ दिवसांनीं, कोणी १० दिवसांनीं, कोणी लघुअन्न सेवन केल्यावर ज्वर नाशार्थ औषध सुरू

करावें असे म्हणतात. केव्हांही द्या, पण आमाचें आधिक्य असतांना मात्र देऊं नये परंतु ज्वराची उत्पत्ती झाल्या दिवशींच रात्रीं चतुर्थांश पाण्याचा काढा द्यावा. तो मंदोष्ण द्यावा त्यायोगानें आम व इतर दोष शांत होतात. वात, पित्त व कफ वगैरे कोणते दोष आहेत हे ३ दिवसांत स्पष्ट होऊन पुढें त्यास पाचनाची योजना करण्यास ठीक पडतें. तीव्र ज्वरानें पीडलेल्या रोग्यास दोषांच्या उद्वेग कालीं ( वांति, दाह, तळमळ इत्यादिकांनीं युक्त ) किंवा दोषांचा संचय होऊन जांड व अंग ओल्या वस्त्रानें गुंडाळल्या सारखें वाटणें, हीं लक्षणें झालीं असतां दिलेल्या औषधाचें पचन न होता तें पुनः ज्वर वाढवितें. ज्वर कमी होऊन अंग हलकें झालें व दोष चलित झाले ( म्हणजे मल, मूत्र, व स्वेद यांची प्रवृत्ति झाली ) तर नुकतांच ज्वर येऊं लागला असला तरी त्यास औषध द्यावें.

दुसरें असें कीं—नूतन उत्पन्न झालेल्या ज्वरांत दिवसां झोंप घेणें, स्नान, अभ्यंग, अन्न खाणें, क्रोध, मैथुन, वारा घेणें, व्यायाम करणें, व काढा देणें इतकें वर्ज करावें. सारांश इतकेंच ध्यानांत ठेवावें कीं नवीन उत्पन्न झालेल्या ज्वरावर म्हणजे त्याचा वेग कांहीं कमी होई पर्यंत त्याजवर कोणत्याही प्रकारचें औषध देऊं नये व भोजनही हितकारक होत नाहीं. यासाठीं वर सांगितल्या प्रमाणें पेज कण्हेरी, यवागू, व यूष वगैरे देऊन ज्वर कमी झाल्या नंतर औषधोपचार करावा. तसें न करितां नूतन ज्वरावर कोणतेंही औषध दिल्यास किंवा शोधन दिल्यास तें विषम ज्वरावर घालवितें. विषमज्वर म्हणजे जो ज्वर विकृत म्हणजे विकोपास जातो, त्यास विषमज्वर म्हणतात.

---

## ६ आजाऱ्याची शुश्रूषा.

रोग्याची खोली स्वच्छ व हवाशीर असावी पण ओलसर जागा नसावी. त्या खोलींत लोकांची वर्दळ नसावी. बिछाना स्वच्छ, असावा, व रोज उन्हांत घालून बदलावा, आणि धुऊन स्वच्छ करून वाळवावा. खोलींतील मल मूत्राची घाण काढून जमीन रोजच्या रोज स्वच्छ ठेवावी. त्या खोलींत कडू निंबाचीं पानें, ऊद, धूप, गुगूळ, नागर-मोथे, चंदन, जटामांशी यांतून मिळतील तितक्याचा धूप करावा. म्हणजे आगंतुक रोगजंतु मरून हवा स्वच्छ होते.

—:0:—

## ७ तक्र प्रशंसा.

यथासुराणाममृतं हिताय ।
तथानराणामिह तक्रमाहुः ॥

( राजनिघंट. )

देवांना जसें अमृत हितावह आहे, तसें मानवांना ताक हितावह आहे. ताक आरोग्य स्थितींत व रोग स्थितींतही घेतलें असतां हितावह आहे. आपल्या रोजच्या जेवणांत शेवटीं ताक भात खाण्याची पद्धति आहे, ती वैद्य शास्त्राच्या आधारानेंच बसविली आहे. ती फार उत्तम आहे. ताकाच्या अंगीं पार्थिव कण विद्रुत करण्याचे धर्म असल्यामुळें रुधिराभिसरण चांगलें होतें. पार्थिव कण विद्रुत होत असल्यामुळें सांध्या भोंवतालीं अथवा स्नायूंमध्यें अशुद्ध द्रव्यांचा संचय न होतां तंतूस पोषक द्रव्यें मिळून त्यांतील अशुद्ध द्रव्यें वेळच्यावेळीं निघून जातात. या क्रिया रक्तांतील जड भागाशीं मिसळून त्याचें पाणी करण्याचा धर्म ताकाच्या अंगीं असल्यामुळें होतात. रक्तवाहिन्यांत जड द्रव्यांचा संचय झाला तर त्या फुगतात व ताठर होतात. या मुळें रुधिराभिसरणास अडथळा होऊन स्नायूंस व इतर अवयवांस रक्ताचा पुरवठा बरोबर होत नसल्यानें शरीर निस्तेज दिसतें. दररोज जेवणांत ताकाचा उपयोग केला तर रक्तवाहिन्यास मदत मिळून जड द्रव्यांचा सांठा न होतां शरीर चांगलें धष्टपुष्ट राहील. ताकानें इंद्रियांचे तंतु बाढीस लागतात.

आणखी शरीरांतील घाण दूर करणारीं जीं मुख्य इंद्रियें यकृत, त्वचा व मूत्रपिंड, ह्यांच्या क्रिया ताकापासून उत्तेजन पावतात. ताकापासून कोठा व आंतडीं वगैरे पचनेंद्रियें मजबूत होऊन अन्नाचा उत्तम पाक करण्यास समर्थ होतात. व त्यापासून उत्तम लाल, वीर्यवान् व निरोगी रक्त तयार होतें. तक्र सेवनामुळें रक्त वाहिन्याची स्थिति चांगली राहून, रुधिराभिसरण चांगलें होतें. म्हणजे अप्रत्यक्ष रीतीनें ताक हें रक्त शुद्धि करणारें आहे. याचें अंगीं औषधी गूण फार आहेत. म्हशीपेक्षां गाईचें ताक चांगलें. ( चिकित्सा प्रभाकर या पुस्तकांतील पदार्थांचे गुणदोष प्रकरणांत ताकाचे गुण पहा. )

मूळव्याध, संग्रहणी, उदर, अमांश, गुल्म, पांडु, कामला, वात, ज्वर, प्रमेह, वातशूळ, अरुचि इत्यादि रोगांनीं ग्रस्त झालेल्या रोग्यांना ताक दिलें असतां त्यांना फार हितावह होतें. हगवण, अमांश अपचन इत्यादि रोग्यांना जर दूधसुद्धां पचत नसेल तर त्यांना नुसत्या ताकावर ठेविलें असतां रोगी बरे होतात.

दोन वर्षांच्या आंतील मुलांना आंतडी दुर्बल होऊन अपचन झालें असतां किंवा आंतड्याचा दाह झाला असतां किंवा हगवण लागली असतां ताजें, पातळ, व मधुर असें गाईचें ताक दिलें असतां चांगला उपयोग होतो.

ताक पिऊन गलगंड जातो. असा प्रयोग " योग रत्नाकरांत " आहे. पण डॉ० ग्यानल्यारिसन आतां अनुभवून मोठ्या आश्चर्यानें लिहितात. कर्नल एडवर्डस् हेही हल्लीं ताकाची शिफारस करून सांगत आहेत. अलीकडाल आमच्यांतील डॉक्टरही रोग्यांस ताकाची शिफारस किंवा ताक घेण्याचा आग्रह करीत आहेत. तापांत स्रोतसें मोकळीं होण्याकरितां तक्र सेवनाची कित्येक डॉक्टरांची शिफारस आहे. व वाग्भटांनीं ती पूर्वीच केली आहे. पुण्याचे प्रसिद्ध महेंदळे वैद्य रोग्यास ताकाचें अनुपान व ताक खाण्यास सांगत म्हणून त्यांना ताके वैद्य म्हणत.

तापकरी रोग्यास तर, कोणताही दोष नाहीं असें अन्न म्हणजे ताकच होय. त्यांत थोडी सुंठ उगाळून सैंधव घालून दिल्यास उत्तम कार्य होतें. ताकांत सायट्रिक, म्युरिॲटिक, लॅक्टिक हीं ॲसिडें असून शिवाय लोणी व दुधांतील इतर पदार्थ असतात. यामुळें त्यांत पाचकपणा अधिक असतो. पोटांतील पाचक पिंडाच्या अशक्ततेमुळें पाचक पित्त उत्पन्न व्हावें तितकें होत नाहीं. यामुळें कित्येक वेळां अजीर्ण होत असतें; अशावेळीं ताकांतील आम्लाचा परिणाम पाचक पिंडावर होतो, व पित्त उत्तम प्रकारें उत्पन्न होतें. शिवाय ताकांतील आम्लाचा परिणाम आंतड्यावर फार चांगला होतो. धाकट्या आंतड्यांत जे सूक्ष्म पिंड आहेत त्यावर शरीरांतील पचन व शोषण क्रिया अवलंबून आहे. हें शोषण जितक्या चांगल्या प्रकारें होईल तितकें पुढें रसोत्पादन व त्याच मानानें रक्त बनणें ह्या क्रिया होत असतात. ज्वरांत विशेषतः ही सर्व क्रिया कमी अधिक प्रमाणानें बिघडलेली असते तर अशावेळीं ही क्रिया सुधारून सुरळींत करणारें अन्न म्हणजे ताकच होय

आंतड्यांतील सूक्ष्म पिंडावर ताकांतील लॅक्टिक ॲसिडचा उत्तेजक परिणाम होऊन मंदावलेल्या स्थितींत रहात नाहींत; आणि ह्याच ॲसिडच्या जंतुघ्न पणामुळें आंतड्यांतील सूक्ष्म जंतूंचा नाश होतो. आंबट ताकानें आंतड्यांतील विषारी जंतूंचा नाश होतो.

ताकांत म्यूरिॲटिक ॲसिड असल्यामुळें तेंही अत्यंत उपयोगी आम्ल होय. ह्याच्या सहायानें यकृत व उंदुक ह्याच्या क्रिया व्यवस्थित होतात. यकृतांतून पित्ताशयांतील होणारा स्राव उत्तम प्रकारें होतो. व तें उंदुकांत पित्तवाहिनीद्वारें स्रवलें जातें. यकृत पित्त हे पचनास अत्यंत उपयोगी होय. व ह्यावरही ताकाचा सुपरिणाम होतो.

ताक तुरट असतें पण ताजें ताक, आंबट, मधुर तुरट असें मजेदार लागतें. ह्या तुरट गुणामुळें ताकाचें महत्व विशेष वाढलें आहे. ताकांतील आम्ल द्रव्यें

जास्त झालेमुळें विस्फोटक होतें म्हणून ताजेंच द्यावें. केवळ अन्न म्हणूनच ताक प्यावें. संग्रहणी, मूळ व्याध वगैरे रोगांत साईसुद्धां दहीं व त्यांत $\frac{1}{4}$ पाणी घालून घुसळून लोणी न काढतांच द्यावें. परंतु ज्वरांत मात्र लोणी काढून द्यावे. कारण लोणी पचण्यास जड आहे; ह्मणून ज्वरांतील अग्नि मांद्याच्या वेळीं ते पचणार नाहीं.

कित्येक डॉक्टर तर अंतरदाहास ताकांत बर्फ घालून घेणेस सांगतात. पण केवळ विशेष प्रसंगींच उपयोग होतो. सर्वत्र होत नाहीं हें लक्षांत असावें. नुस्तें ताजें ताकच उत्तम व निर्दोष होय.

डॉ. शॅफ्टस्बरी ह्मणतात -"४ पैशांच्या ताकाच्या सेवनानें जितकी शक्ति अंगीं येईल तितकी ४ रुपयांच्या मांसानेंही यावयाची नाहीं." असो, ताक हें शरीरसंवर्धक असल्यामुळें नेहमींही खाण्यास सवंग असा अमृत रस आम्हा गरीब मानवांकरितां ईश्वरानें निर्माण केला आहे.

## ८ ज्वरांत दूध कां देऊं नये याचा खुलासा.

संपूर्ण ज्वर अजीर्णादि कारणा पासून उत्पन्न होतात त्यामुळें जठराग्नि अति दुर्बल झालेला असतो व दूध हें पौष्टिक अन्नांतलें आहे, ह्मणून ज्वरी मनुष्यास तें पचत नाहीं. कारण त्यावेळीं त्याचा जाठर रस थोडा उत्पन्न होतो. त्यामुळें दूध न पचतां त्याच्या कवड्या बनतात. किंवा एकच गोळा बनतो. अर्थात पचन लवकर होत नाहीं यामुळें तो स्पंजा सारखा होतो. गोळ्यांच्या आंतील भाग तर अगदींच अपक्क राहतो. ( आणि दुधाच्या जपणेचे जे खरे नियम आहेत त्याप्रमाणें शुद्ध दूध सर्व रोग्यास मिळणें अशक्य असतें. शहरांत तर ज्वरांत देण्यास सशास्त्र दुधाचें नांवच नको. चांगल्या दुधाचाच ज्वरांत निषेध सांगितला आहे तर अयुक्त दूध घेण्याची शिफारस करणें म्हणजे रोग्यास लवकर मरण्यास मदत करणेंच होय. ) ते न पचल्यामुळें त्याचे चिवट व दुर्गंध युक्त खडे बनतात. ते जठरांत व आंतड्यांत राहून गेल्यामुळें जंतूंची वाढ लवकर होऊन ज्वर जास्त वाढण्यास साधन होतें. करितां ज्वरांत दूध देणें हें घातक आहे. सर्पास दूध पाजिलें असतां जसें त्याचें वीषच होते, तसें तें आमयुक्त कोठ्यांत आमाची अधीकच वृद्धि करितें असें जरी आहे तरी रक्तक्षयज्वर, उरःक्षतज्वर, श्रमज्वर, आघात ज्वर, भयज्वर, वगैरे ज्यांत अजीर्णाचा संबंध नसतो अशा आगंतुक कारणांनीं उत्पन्न झालेल्या ज्वरांस दूध अवश्य द्यावें. कारण अशा ज्वरांत रोग्याची पचन क्रिया बिघडली नसते. परंतु प्लेग, एन्फ्लुएंझा, कीटकदंशजनितज्वर, दूषितजलजनितज्वर, इत्यादि रक्त विकृत ज्वरांत कित्येक डॉक्टर, वैद्य अथवा हकीम हे दूध घेण्यास सांगतात; पण हे ज्वर कीटक विषजन्य असल्यामुळें दूध दिले असतां तें शरीरांतील विष दूषित रक्तामुळें लवकर बिघडून विष कीटकास मात्र पोषक झाल्यामुळें त्यांची वाढ झपाट्यानें होण्यास मदत होते. करितां अशा ज्वरांत दूध योजणें बरोबर नाहीं. दुधाची योग्यता फार मोठी आहे हे सर्वांस मान्य आहे. पण सर्वच ज्वरांतमात्र त्याचा उपयोग होत नाहीं. इतर रोग क्षय, पादाग्र वात, संधिवात, रक्त पित्तांत, इत्यादिकांत दुधाचा चांगला उपयोग होतो यांत संशय नाहीं.

## ९ वात ज्वर.

**लक्षणें**—शरीरास कंप, कंठ आणि ओंठ शुष्क होणें, मलावरोध, शिंका न येणें, पोट, मस्तक, कंबर, डोळे, अंग व पार्श्वभाग ही दुखणें, निद्रा न येणें, ज्वर केव्हां थोडा, केव्हां फार येणें; तोंड बेचव होणें, अन्नावर वासना व रुचि नसणें, जांभया येणें, पोट फुगणें, अन्न न पचणें, श्रम, मोह, अंगावर रोमांच येणें, डोळ्यांस झांपड, मांड्या

फुटणें, कानांत नाद होणें, सुका खोकला हीं लक्षणें होतात.

औषध जिरल्याचीं लक्षणें—वातांचें अनुलोमन ह्मणजे वात मार्गावर असणें मनाला स्वस्थपण, भूक व तहान योग्य प्रमाणांत योग्य वेळीं असणें, शरीराला हालकेपणा वाटणें, इंद्रियें प्रसन्न असणें. ढेंकर स्वच्छ व मोकळी येणें. हीं औषध जिरल्याचीं लक्षणें, आणि थकवा अंगवळें, अंगाचा दाह, घेरीयेणें, मूर्च्छा, मस्तक दुखणें, चैन न पडणें, व शक्ति क्षीणता हीं औषध न जिरल्याचीं लक्षणें.

## वातज्वरास उपाय

१ पिंपळमूळ, पित्तपापडा, अडुळस, भारंगमूळ, सुंठ, गुळवेल ह्यांचा काढा, निकाढा, थोडा मध घालून देणें. ह्मणजे तीव्र वातज्वर जातो.

काढ्यांत मध काढा निवाल्यावर घालावा आणि गूळ, साखर, खडीसाखर, तूप, तेल वगैरे घालणें झाल्यास ऊन असतांच घालावीं. ह्याचें प्रमाण काढ्यांत घातलेल्या द्रव्यांचा चतुर्थांश ह्मणजे काढ्याचें द्रव्य ४ तोळे असलें तर गूळ वगैरे १ तोळा असावें.

२ सालवण, मिठवण, त्रिकणामूळ, मनुका गुळवेल, उपळसरी ह्यांचा काढा तीव्रवात ज्वराचा नाश करितो.

३ अद्भुत वात भैरव-शुद्ध हिंगूळ, मिरे, टांकणखार, पिंपळी समान घेऊन आल्याच्या रसांत खलून चार प्रहर खल झाला ह्मणजे वाल प्रमाणें गोळ्या कराव्या. आल्याचा किंवा तुळशीचा रस ह्यांतून दर वेळीं १ गोळी द्यावी.

४ वात ज्वरास हिंगुलेश्वर शुद्ध हिंगूळ, पिंपळी समभाग खलून मधांतून वाल प्रमाणें देणें.

५ वात ज्वरास पाचन-गुळवेल, पिंपळ मूळ, सुंठ, ह्यांचा काढा निकाढा दिल्यास ज्वराचें पाचन होतें. किंवा बृहत्पंच मुळाचा काढा द्यावा. ( कोश पद्म. )

६ वाळा, सुंठ, पिठवण, किराईत, साळईची मुळी रिंगणी मूळ, डोरली मूळ, गुळवेल, गोखरू ह्यांचा काढा निकाढा द्यावा. ह्मणजे वातज्वर तत्काळ जातो. दि. ३।७

७ गुळवेल, धमासा, नागर मोथे, यांचा काढा निकाढा द्यावा. दि. ७

८ तीव्र वात ज्वरास-सालवण, त्रिकण मूळ, मनुका गुळवेल, उपळसरी, कावळी, शेवग्याची साल, ह्याचा काढा निकाढा द्यावा. दि. ३।७

९ पिंपळी, गुळवेल, सुंठ, देवदार, रिंगणी मूळ, भारंगमूळ, धणे, पिंपळमूळ, पुष्करमूळ, ह्यांचा काढा निकाढा दिल्यास श्वासकास युक्त वातज्वर घालवितो.

१० कचोरा, पोखरमूळ, भारंगमूळ, काकडशिंगी, धमासा, गुळवेल, सुंठ, पहाडमूळ, किराईत, कुटकी समभाग घेऊन काढा निकाढा दिल्यास वात ज्वर, खोकला, उपद्रावासहित जरी असला तरी, तो ज्वर जावा.

११ त्रिफला, त्रिकटु, गूळ, साखर सर्व १।१ भाग आणि तेल सर्वांच्या अर्धा भाग घेऊन चूर्ण करून १।१ तोळ्याच्या गोळ्या करून एक गोळी खाऊन वर ऊन पाणी प्यावें. ह्मणजे कुक्षीशूळ, अरुची, खोकला, वातज्वर हे दूर होतात.

१२ पारा, गंधक, हिंगूळ ही शुद्ध व समान घेऊन त्यास आल्याच्या रसाची भावना देऊन पिंपळीच्या रसाच्या किंवा काढ्याच्या ७ भावना द्याव्या. नंतर सर्वांचा खल करावा. मग मिऱ्याचा काढा भांगेचा काढा, काळ्या धोत्र्याचा रस, याप्रमाणें प्रत्येकाच्या ७।७ भावना देऊन वाल प्रमाण गोळ्या करून, मध पिंपळींतून १ गोळी दिल्यास-वात ज्वर हटकून जातो, रोज २ वेळां. दि. ७ याला रससागर ह्मणतात.

---

## १० पित्तज्वर.

**लक्षण**—शरीर पिंवळट होणें, सर्वांगाचा दाह, तृषा, मूर्छा, अल्प निद्रा, तोंड कडू, ओकारी, भोंवळ बडबडणें, शौचास पातळ होणें, घाम येणें, धुंदी येणें, थंड पदार्थांवर इच्छा असणें, मलमूत्र, नेत्र पिंवळट होणें, हीं लक्षणें होतात. पित्त ज्वरांत प्रथम वांति करविल्यास चांगलें, व दोषही कमी होतो. वांती पित्त पडे इतकीच करवावी.

### पित्तज्वरावर उपाय

१ मनुका, कडू पडवळ, कडू निंब, कुटकी, बाळ हिरडे, रिंगणी मूळ, वाळा, धणें, लोध, नागर मोथे, सुंठ, ह्यांचा काढा निकाढा दिल्यास महान पित्तज्वर हटवितो.

२ मनुका, हिरडा, पित्तपापडा, नागरमोथे कुटकी, बाव्याच्या शेंगेंतील मगज इतक्यांचा काढा निकाढा दिल्यास बडबड, मूर्छा, दाह, भोंवळ, शोष. तृषा. इतक्यांनीं युक्त जो पित्तज्वर त्याचा नाश होतो.

३ धमासा, पित्तपापडा, गहुला, किराईत, अडुळसा, कुटकी, इतक्यांचा काढा करून साखर घालून दिल्यास तृषा, रक्तपित्तज्वर, दाह यांचा नाश होतो.

४ नुसत्याच पित्त पापड्याचा काढा पित्तज्वर नाश करील. मग चंदन, वाळा, सुंठ यांनीं युक्त असा काढा दिल्यास जाईलच जाईल यांत संशय काय?

५ रक्त चंदन, धणें, गुळवेल, कडू निंबाची साल, पद्मकाष्ट, यांचा काढा निकाढा दिला असतां पित्त ज्वर, कफज्वर, तृषा, दाह, वायु, यांचा त्वरित नाश होतो.

६ सुंठ, पित्तपापडा, वाळा, नागर मोथे, रक्त चंदन, यांचा काढा थंड करून द्यावा ह्मणजे तृषा, ओकारी, दाह पित्तज्वर हीं जातात.

७ रक्त चंदन, धणें, पांढरी वसू, वाळा, पित्त पापडा, यांचा काढा साखर घालून द्यावा.

८ शिवणमूळ, कावळी, मनुका, चंदन, वाळा, नेत्र वाळा, नागरमोथे, पित्तपापडा समभाग घेऊन काढा करून निवाल्यावर गाळून मध घालून द्यावा. यानें पित्तज्वर, दृष्टिभ्रम, दाह, वांति, यांचा नाश होतो.

९ जुनी चिंच रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं अछेर पाणी गाळून घेऊन त्यांत सुंठ, दालचिनी, एक पैसा भार घालून अष्टमांश काढा करून उतरते वेळीं साखर घालून गाळून पाजावा. ह्मणजे पित्तज्वर लवकर जातो. याचा निकाढा न करितां रात्रीं देण्यास, सकाळीं चिंच भिजत घालावी आणि वरील क्रम करावा.

१० पंच भद्र कषाय— सुंठ, नागर मोथे, पित्त पापडा. गुळवेल, काडेचिराईत ह्यांचा काढा दिल्यानें पित्तज्वर जातो.

११ भुईकोहळा, डाळिंब, लोध, कवठ, हीं वाटून तृषेनें व दाहानें व्यात असेल त्याच्या मस्तकास लेप करावा.

१२ महाळुंगाचेकेशर, मध, सैंधव, कालवून मस्तकास लेप केला असतां जिव्हा, टाळू, गळा, क्लोम ( पिपासास्थान ) इतक्या ठिकाणचा शोष पडला असला तरी जातो.

१३ उंबराच्या मुळ्या, गुळवेल ह्यांचा काढा साखर घालून प्यावा. अथवा कडू पडवळाचा काढा साखर घालून किंवा बडीशेपाचा काढा साखर घालून प्यावा. पित्त ज्वराचा नाश होतो.

१४ पित्तज्वरास पाचन—कुटकी, नागरमोथे, इंद्रजव, पहाडमूळ, कायफळ, वाळा, यांचा काढा शर्करा युक्त प्राशन केला असतां पित्तज्वराचें पाचन करितो.

१५ पित्तज्वरांत मस्तक दुखणें, मस्तक तापणें, तीव्रवज्र यांस निळीं कमळें पाण्यांत उकळून त्या काढ्यांत खडीसाखर घालून पाक करावा हें सरबत ३।३ तासांनीं पाजावें.

१६ शुद्ध पारा, गंधक, ताम्रभस्म, बचनाग, समभाग घेऊन खलून त्यास निर्गुंडीच्या रसाची व आल्याच्या रसाची ११ भावना देऊन खलून गुंज प्रमाणें मात्रा कराव्या. दरवेळीं १ मात्रा आल्याच्या रसांतून द्यावी. २ प्रहरांत पित्तज्वर जातो. गार पाण्यानें स्नान करावें. ताकभात खावा. डाळिंब खावें. ही मात्रा शूळ व संग्रहणीवरही द्यावी. ह्यास सिंहरस ह्मणतात. राग, साहस, स्त्री, व्यायाम वर्ज.

१७ कडूपडवळ व सातू यांचा काढा करून निवाल्यावर मध घालून द्यावा. पिताक्षणींच अंतर दाह, तहान, व पित्तज्वर जातो. किंवा ४ तोळे धणे रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं वाटून गाळून त्यांत खडीसाखर घालून पाजावें. अंतर दाह जातो.

---

## ११ रक्तपित्तज्वर.

**लक्षण**— इतर लक्षणें पित्तज्वरांची असून शिवाय तोंडांतून रक्त किंवा रक्तमिश्रित तांबडा बडका पडतो.

### रक्तपित्तज्वरावर उपाय.

१ बाळ हिरड्याचें चूर्ण, तेल, तूप, मध ह्यांज बरोबर चाटलें असतां दाहज्वर, खोकला, रक्त पित्त, विसर्प, श्वास, वांति ह्यांसह ज्वर जातो.

२ धमासा, अतिविष, किराईत, कुटकी, अडुळशाची पानें, पित्तपापडा, मनुका ह्यांचा काढा साखर घालून प्यालें असतां तृषा, दाह, कंडू, रक्तपित्तज्वर, हीं नाश पावतात.

३ धमासा, पित्तपापडा, गहुला, किराईत, अडुळसा, कुटकी इतक्यांचा काढा करून साखर घालून घेतला असतां तृषा रक्तपित्तज्वर, रक्त पडणें, दाह यांचा नाश होतो.

४ गुळवेल, हिरडेदळ पित्त पापड्याच्या काढ्यानें रक्त पित्तज्वर शमतो.

५ वाळा, नागरमोथे, पित्तपापडा, सुंठ, रक्तचंदन, धणे. कडुनिंबाच्या काड्या, पद्मकाष्ट, ह्यांचा काढा रक्तपित्तज्वरांत द्यावा. यानें आणखी दाह, शोष, ओकारी, हीं जाऊन जठराग्नी प्रदीप्त होतो.

६ कडुनिंब, अतिवीष, लोध, नागरमोथे, इंद्रजव, गुळवेल, वाळा, धणें, कोंवळे बेलफळ, ह्यांचा काढा निवाल्यावर मध घालून द्यावा. यानें अतिसार, श्वास, कास, रक्त पित्तज्वर, आणि ज्वर ही जातात.

७ गुळवेल कुटून रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं कुस्करून गाळून तें पाणी, खडीसाखर घालून पाजावें. तें रक्त पित्तज्वर नाशक आहे.

८ द्राक्षें ( मनुका ) रक्त चंदन, कमळकंद, नागरमोथे, कुटकी, गुळवेल, आवळकाठी, वाळा, काळा वाळा, लोध, इंद्रजव, पित्तपापडा, फालसा, कांग, धमासा, अडुळसा, जेष्टमध, कडूपडवळ, किराईत, धणे, ह्यांचा काढा घेतला असतां पित्तापासून झालेला ज्वर, तृषा, दाह, प्रलाप, रक्तपित्त, आम्लपित्त, मूर्छा, ओकारी, शूळ, मुखशोष, अरुचि, श्वास, कास, तोंडाला पाणी सुटणें, ह्यां सर्वांचा नाश होतो.

——0——

## १२ कफज्वर.

लक्षण—कोरडी ओकारी, अंगजड, तोंड गुळमट किंवा खारट होणें, पडसें, खोकला, आळस अंग थंड होणें, मळमूत्र, नेत्र शुभ्र, श्वास, स्वरभंग, शब्दजाड्य, नाक गळणें, मस्तक दुखणें, व जड होणें, अधिक निद्रा, रसवाहिनी नाडीचा रोध, अंगावर रोमांच, घाम, पोट फुगणें, फार मुतणें, डोळ्यावर झांपड, डोळ्यांतून पाणी गळणें, अस्वस्थता, इतक्या लक्षणांनीं कफज्वर असतो.

### कफज्वरावर उपाय.

१ पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, मिरें, एलची, ओवा, इंद्रजव, पहाडमूळ, रेणुकाबिज,

जिरें, भारंगमूळ, कडू निंबफळें, हिंग, कुटकी, शिरस, वावडिंग, अतिविष, मोरवेल ह्यांचा सर्व किंवा मिळतील तितक्या औषधांचा काढा करून द्यावा, कफज्वरावर उत्तम आहे. रात्रीं निकाढा द्यावा.

२ पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ ह्या पंच कोलाचा काढा निकाढा कफ नाशक आहे.

३ कुटकी, पिंपळमूळ, हिरडा, बाहवा, नागरमोथे ह्यांचा काढा सर्वज्वर नाशक आहे.

४ कडुपडवळ, हिरडा, बेहडा, आवळकाठी, कुटकी, कचोरा, अडुळसा, गुळवेल ह्यांचा काढा मध घालून घेतला असतां कफज्वर नाशील.

५ रिंगणीमूळ, गुळवेल, पिंपळी, सुंठ, इतक्यांचा काढा करून प्यालें असतां ज्वर, श्वास, कफ, खोकला, शूळ, अग्निमांद्य, पोटांतलावायु, यांचा नाश करितों.

६ किराईत, कडूनिंब, अतिविष, इंद्रजव, वाळा ह्यांचा काढा उचकी, श्वास, खोकला, ह्यांसह कफज्वराचा नाश करितो.

७ किराईत, कडूनिंब, पिंपळी, कचोरा, सुंठ, शतावरी, गुळवेल, रिंगणीमूळ, इतक्यांचा काढा कफज्वराचा नाश करितों.

८ कुटकी, कडूनिंब, अतिविष, त्रिकूट, इंद्रजव वाळा, ह्यांचा काढा उचकी, श्वास, खोकला ह्यांसह कफज्वराचा नाश करितों

९ रिंगणीमूळ, अडुळसा, देवदार, सुंठ, गुळवेल ह्यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा. म्हणजे कफज्वर व खोकला जातो.

१० कोष्टकोळिंजन, इंद्रजव, मिरे, कडूपडवळ, मोरवेल ह्यांचा काढा मध घालून द्यावा. कफज्वर जातो.

११ कफज्वरास पाचन—हिरडेदळ, महाळुंगाचे मूळ, सुंठ, पिंपळमूळ, ह्यांचा काढा जवखार घालून ज्वराच्या १२ दिवसानंतर द्यावा

१२ सुंठ, अडुळशाचीं पानें, नागर मोथें, धमासा, ह्यांचा काढा ७ दिवस द्यावा.

१३ काकडशिंगी, कायफळ, पिंपळी, कमळकंद ह्यांचे चूर्ण मधांतून द्यावें.

१४ निर्गुडीच्या पाल्याचा काढा मिऱ्याचें चूर्ण घालून घेतला असतां कानाचे दडे व मांड्याचे निर्बलत्व व कफज्वर जातो.

१५ मृत संजीवनी रस-- -शुद्ध जेताळ ३ भाग, टांकण खार २ भाग, हिंगूळ ४ भाग, अभ्रक भस्म १ भाग, सुंठ मिरे पिंपळी, चित्रक, सैंधव, १।१ भाग. या सर्वांचा खल करून नंतर आल्याच्या रसांत खलून वाल प्रमाणें गोळ्या कराव्या. १ गोळी आल्याच्या रसांत दिली असतां २ प्रहरांत ज्वर नाहींसा होतो. पथ्य तूप भात. ह्यानें महाघोर सान्निपात, त्रिदोष, विषमज्वर, आमवात, वातशूळ, गुल्म, प्लीहा, जलोदर, शीत पूर्वकज्वर, संतत संज्ञक, विषमज्वर, ह्या रोगांवर ह्या मात्रेचा चांगला उपयोग होतो.

---

## १३ वातपित्तज्वर.

**लक्षण**--तहान, मूर्छा, भ्रम, दाह, निद्रानाश, मस्तकशूळ, तोंड, कंठ यांचा शोष, मळमळे, रोमांच, अरुचि, अकस्मांत अंधेरांत पडल्या सारखें वाटणें, सांध्यांत वेदना, जांभया, बडबड, मूत्राचा रंग काळसर किंवा धुरकट, डोळ्याची आगहोणें, मस्तक जड होऊन दुखणें, तोंड कडू, आंबूस, असें चमत्कारिक होणें, हीं सर्व किंवा कमी लक्षणें होतात.

पाचनास--वात, पित्त, कफ यांत पाचनें सांगितलीं आहेत त्यांतील दोन दोषांवरील एकत्र करून पाचनार्थ द्यावी वात, पित्तावरील पाचन वातपित्तज्वरास द्यावें.

### वातपित्तज्वरावर उपाय.

१ किराईत, कुटकी, आवळकाठी, कचोरा,

मनुका, मिरे, सुंठ, गुळवेल ह्यांचा काढा गूळ घालून थंड करून प्यावा. वात पित्तज्वर जातो.

२ गुळवेल, पित्तपापडा, नागरमोथे, किराईत, सुंठ यांचा काढा वात पित्तज्वरावर द्यावा.

३ मनुका, किराईत, गुळवेल, अडुळसा, कचोरा ह्यांचा काढा दिल्यानें वातपित्तज्वर जातो.

४ नागरमोथे, धणे, किराईत, गुळवेल, कडू-निंब, कुटकी, कडूपडवळ ह्यांचा काढा निकाढा द्यावा.

५ रिंगणीमूळ, भारंगमूळ, अडुळसा, रासना, धमासा, मोचरस, बाव्याच्या शेंगेतील मगज, त्रिफळा ह्यांचा काढा द्यावा.

६ रिंगणीमूळ, गुळवेल, रासना, त्रायमाण, हिरडा, मसुऱ्याची डाळ ह्यांचा काढा द्यावा म्हणजे वातापित्तज्वराचा नाश होतो.

७ बाजरीचें लाहीपीठ ३ तोळे घेऊन त्यांत जुना गूळ अर्ध तोळा घालून २ शेर पाण्यांत काढा करून अछेर उरवावा. व निजतेवेळीं पिववेल तितका प्यावा. म्हणजे घामसुटून वातपित्तज्वर जातो.

८ मनुका, पित्तपापडा, बाहव्याच्या शेंगातील मगज, कुटकी, नागरमोथे, हिरडेदळ ह्यांचा काढा निकाढा द्यावा. म्हणजे वातपित्तज्वर, मूर्छा, सूज, तलखी, बडबड, भ्रम दाह यांचा नाश होतो. हा उत्तम आहे.

९ निळेकमळ, चिकणा, द्राक्षें, मोहाचीसाल, जेष्ठमध, वाळा, पद्मकाष्ट, शिवणमूळ, फालसा, या औषधांचा हिम करून प्यालें असतां, वातपित्तज्वर बडबड, भ्रम, ओकारी, मूर्छा, तहान हीं दूर होतात.

१० बाहव्याचा मगज, नागरमोथे, जेष्ठमध, मोहाचें फूल, बाळहिरडे, हळद, दारू हळद, कडू-पडवळ, निंबसाल, गुळवेल, कुटकी, ह्यांचा काढा दिला असतां वात पित्तज्वर जातो.

११ मधुकाष्ट, उपळसरी, मनुका, जेष्ठमध, कमळकंद, रक्तचंदन, शिवणमूळ, लोध, त्रिफळा, कोष्ट, नागकेशर, फालसा कमळाची बिसें, ह्यांचा काढा साखर, मध, लाह्या घालून द्यावा. म्हणजे वातपित्तज्वर, दाह, तृषा, मूर्छा, अरुचि, भ्रम, व रक्तपित्त यांचा नाश होतो.

१२ नवज्वरेभ सिंह--शुद्ध पारा, लोह भस्म, गंधक, ताम्रभस्म, सिसेभस्म, त्रिकटु, समभाग चूर्ण व अर्धा भाग बचनाग घेऊन आल्याच्या रसांत २ दिवस खल करून वाल प्रमाण गोळ्या कराव्या आल्याचारस व खडिसाखर यांतून १।१ गोळी द्यावी. यानें वात पित्तज्वर, वात विकार, संग्रहणी, हीं जातात.

१३ पित्तज्वरांत बाहेरून अंगाचा दाह झाल्यास कडुनिंबाची पानें वाटून पाण्यांत कालवून रस अंगास लावावा.

---

## १४ वातकफज्वर.

**लक्षण**—सांध्याना फूट, फार निद्रा, अंग जड, मस्तक जड, पडसें, श्वास, खोकला, किंचित घाम, शरीराचा दाह, ज्वराचा वेग मध्यम, भ्रम झांपड, अंग कांपणें, मूत्र गढूळ, जांभया, डोळ्यांतून पाणी येणें, नाक वाहणें, तोंड बुळबुळीत व खारट वाटणें, हीं लक्षणें होतात.

### वातकफज्वरावर उपाय.

१ कडुनिंब, सुंठ, देवदार, गुळवेल, कायफळ, कुटकी, वेखंड, ह्यांचा काढा संधिपीडा, मस्तक पीडा, कास, अरुचि, वातकफज्वर, यांचा नाश करितो.

२ रिंगणीमूळ, सुंठ, पुष्करमूळ, गुळवेल ह्यांचा काढा वात कफज्वर, श्वास, कास, अरुचि, पार्श्वशूळ, त्रिदोष जनितज्वर, ह्यांचा नाश करितो.

३ अघाड्याची राख मधांत चाटण्यास द्यावी. म्हणजे छातींतील व घशांतील कफ विरघळतो.

४ रिंगणीमूळ, सुंठ, येरंडमूळ, गुळवेल ह्यांचा काढा वात कफज्वर, त्रिदोष ज्वर, कास, श्वास,

पाठीचा शूळ ह्यांचा नाश होतो.

५ बाहव्याचा मगज, पिंपळमूळ, नागरमोथ, कुटकी, हरीतकी ह्यांचा काढा द्यावा म्हणजे वात कफज्वर, आमशूळ दूर होऊन दीपन पाचन होतें.

६ नागरमोथे, गुळवेल, सुंठ, अडुळसा पित्त-पापडा, हिरडा, रिंगणीमूळ, धमासा ह्यांचा काढा वातकफज्वरावर प्रशस्त आहे.

७ नागरमोथ, सुंठ, पित्तपापडा, गुळवेल ह्यांचा काढा कफवात, अरुचि, ओकारी, दाह, शोष ह्यांचा नाशक आहे.

८ काडेचिराईत, ओवा, कुटकी, वेखंड, कायफळ यांचें चूर्ण अंगास लाविलें असतां सतत येणारा घाम दूर होतो.

९ किराईत, सुंठ, गुळवेल, रिंगणीमूळ, पिंपळी पिंपळमूळ, लसूण, कात्रनिर्गुडी ह्यांचा काढा वात कफज्वर नाशक आहे.

१० पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रकमूळ, सुंठ, वेखंड, अतिविष, जिरे, पाडळमूळ, कुड्याची साल, रेणुकाबीज, काडेचिराईत, मोरवेल, मोहऱ्या, मिरे, कायफळ, येरंडमूळ, भारंगमूळ, वावडिंग, काकडशिंगी, रुईचेंमूळ, डोरलीं, रास्ना, धमासा, ओवा, अजमोदा, शिवणमूळ, हिंग हीं औषधें सम भाग घेऊन त्यांचा काढा करून प्यालें असतां वात-कफज्वर, वायु, शीत, घाम, कांपरे, झांपड, रोमांच, अरुचि, महावात, अपतंत्रकवात, सर्व गात्रांची शून्यता, व संपूर्ण ज्वर यांचा नाश करितो हा काढा सर्वच ज्वरावर प्रशस्त आहे.

११ रिंगणीमूळ, ओवा, गुळवेल ह्यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा म्हणजे वातकफज्वर, श्वास, शूळ, पडसें, खोकला यांचा नाश होतो.

१२ कडूपडवळ, सुंठ, यव, पिंपळी यांचा काढा दिला असतां तहान, वातकफरोग, शूळ, श्वास, कास, अरुचि, बद्धकोष्ट यांवर दीपन पाचन असून हित-कारक आहे.

१३ ज्वरेभ सिंहरस —शुद्धपारा, मिरे, सिसेभस्म, अभ्रकभस्म, ताम्रभस्म, जेपाळ हे सम भाग व गंधक ३ भाग सर्व एकत्र करून भांग, सूर्यवल्ली, व कडू-वृंदावन याच्या स्वरसांत ३ दिवस खलून आल्याच्या रसाच्या ७ भावना द्याव्या. २ गुंजाप्रमाणें विड्याच्या पानाच्या रसांतून द्यावा. तीव्र कफवातज्वर जातो.

## १५. कफपित्तज्वर

**लक्षण**—थंडी वाजणें, तोंड कडुवट असून चिकट, झांपड, मोह, खोकला, अरुचि, तहान, कफ, व पित्त पडणें, दाह होणें. मूत्राचा रंग तांबूस, व केव्हां पांढरा, निद्रा न येणें, कंठावरोध, तळपायाची आग, अग्निमांद्य, गळा धरणें, मुखाला दुर्गंधी हीं लक्षणें होतात.

### कफपित्तज्वरांवर उपाय.

१ कफपित्तज्वरावर पाचन—नागरमोथे, पित्त-पापडा, ह्यांचा काढा ज्वराच्या चवथ्या किंवा पांचव्या दिवशीं पाचनार्थ द्यावा.

२ कारलीचा रस मिऱ्याचें चूर्ण घालून द्यावा. कफ पडून ज्वराचा जोर कमी होतो.

३ कडूपडवळ, रक्तचंदन, मोरवेल, कुटकी, पहाडमूळ, गुळवेल ह्यांचा काढा पित्तकफज्वर, वांति, दाह, कंडू हीं घालवितात.

४ रिंगणीमूळ, गुळवेल, भारंगमूळ, सुंठ, इंद्र-जव, धमासा, किराईत, चंदन, नागरमोथे, कडू-पडवळ, कुटकी ह्यांचा काढा दिल्यानें पित्तश्लेष्मज्वर दाह, तृषा, अरुचि, उचकी, खोकला, हृदयशूळ, कुक्षिशूळ यांचा नाश होतो.

५ गुळवेल, कडूनिंब, कुटकी, नागरमोथे,

इंद्रजव, सुंठ, कडूपडवळ, चंदन ह्यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा. याला अमृताष्टक म्हणतात. यानें पित्तकफज्वर, ओकारी, अरुचि, छाती दाटणें, दाह, तृषा हीं जातात.

६ रिंगणीमूळ, गुळवेल, सुंठ, पुष्करमूळ, काडेचिराईत ह्यांचा काढा सर्व ज्वरांस तत्काळ दूर करितो.

७ अडुळशाचा पानाफुलांसह रस काढून त्यांत मध साखर घालून द्यावा म्हणजे कफपित्तज्वर, रक्त पित्त, कावीळ, हीं जातात.

८ रक्तचंदन, पद्मकाष्ट, धणे, गुळवेल, निंब-काड्या ह्यांचा काढा कफपित्तज्वरांचा नाश करून ओकारी, दाह, शोष यांसही घालवितो.

९ धणे, वाळा, नागरमोथे, हळद, बाळहिरडे, जिरे ह्यांच्या काढ्यानें कफपित्तज्वर जातो.

१० सूर्यशेखर रस—शुद्धपारा, गंधक, टांकण-खार, हे १।१ भाग, शुद्ध जेपाळ २ भाग, सैंधव, मिरे, चिंचेचाक्षार, साखर एकेक भाग घेऊन निंबू रसांत खलून २ गुंजा प्रमाण गोळ्या करून ऊन पाण्यांतून घेणें. यानें वातश्लेष्मज्वर जातो.

११ कडूपडवळ, आले यांचा काढा पित्तश्लेष्म-ज्वर, ओकारी, दाह कंडू हीं घालवितो.

१२ कडूपडवळ, कडूनिंब, त्रिफळा, चिकणा-मूळ ह्यांचा काढा दिल्यानें पित्तकफज्वर जातो.

१३ किरमाणी, ओंवा, वेखंड, हिंग, वाळा, धणे, हळद, नागरमोथे, जेष्टमध, भारंगमूळ, पित्तपापडा हीं समभाग घेऊन अष्टमांश काढा करून मध घालून द्यावा. कफपित्तज्वर जातो.

१४ चंद्रशेखर रस—शुद्ध पारा, गंधक, मिरीं, टांकणखार, या सर्वांसमान मनशीळ एकत्र करून त्यास माशाच्या पित्ताची ३ दिवस भावना देऊन २ गुंजा भार मात्रा करून आल्याच्या रसांतून द्यावी. वर थंड पाणी प्यावें. पथ्य ताकभात वांग्याचें भरीत द्यावें. म्हणजे ३ दिवसांत कफपित्तज्वराचा नाश होतो.

१५ रसरत्नरंगांत सांगितलेला पित्तश्लेष्म ज्वरां-कुश-शुद्ध पारा, गंधक, टांकणखार, मिरे समभाग घेऊन सर्व एकत्र खलून त्यास माशाच्या पित्ताच्या ७ भावना द्याव्या. शुष्क झाल्यावर भरून ठेवावें. २ वाल औषध आल्याच्या रसांत खडीसाखर घालून त्यांतून दिलें असतां १ प्रहरांत ज्वराचा नाश होतो. पथ्य, ताकभात, वांग्याचे भरीत.

## १६ सन्निपातज्वर.

सन्निपाताचें कारणः—अतिआंबट, स्निग्धोष्ण, तीव्रउष्ण, मधुर मद्य, ऊन किंवा शेक घेणें, तुरट पदार्थ, कामक्रोध, अतिरुक्ष, फार जड, आकंठ भोजन, मांस भक्षण, शीत पदार्थ सेवन, शोक, श्रम, चिंता, पिशाच्यबाधा, व फार स्त्रीसंग इत्यादि कारणांनीं चैत्र, वैशाख, आश्विन, कार्तिक, श्रावण, भाद्रपद, या महिन्यांत प्रायः सन्निपाताचा प्रकोप होतो.

सन्निपात कर्मविपाकः—विश्वासघात करणें, वाईट शब्द बोलणें, दुसऱ्याचा जीव घेणें, अपराधाशिवाय बंदीत ठेवणें, द्वेष करणें, निरर्थक रागें भरणें, शास्त्र, वेद, द्विज यांजवर दोषारोप करणें, होम कुंडे, याग, जलाशय, विवाह, विहिरी व अरण्य यांचा नाश करणें, इत्यादि कारणांनीं १३ प्रकारचे सन्निपात होतात. याचा परिहार करणें, तो अनेक प्रकारचीं धर्म कृत्यें, परोपकारिक कृत्यें, मनाला समाधान होण्या सारखें कृत्य, देव भक्ति करवावी, विहिरी, तलाव औषधालयें, मार्गावर वृक्ष लावणें, इत्यादि उपायांनीं मनःशांतीं करवावी. हा सन्निपात नव्हे तर केवळ मृत्यूच होय. सन्निपाताला जो वैद्य जिंकतो, तो मृत्युंजयच होय. ह्मणून सन्नि-पात रोग्याला जो बरा करितो त्या वैद्याचे प्रत्युप-कारी, सर्वस्व दान केले तरी पुरेसें होत नाहीं. सन्निपातज्वर ह्मणजे त्रिदोषज्वर, वातादित्रिदोष कांहीं

निमित्तानें प्रकोप पावलें असतां त्यापासून जो ज्वर येतो तो सन्निपातज्वर होय.

सन्निपातज्वराचें लक्षणः—क्षणांत दाह, क्षणांत शीत, हाडें, संधि, मस्तक यांचे ठायीं शूळ, डोळ्याला पाणी येणें, गढूळ होणें, किंवा लाल वटारलेले असतात. व कानांत शब्द होतो, व शूळ होतो, घशांत बारीक कांटे उत्पन्न होणें, व कंठांतून २ प्रकारचा ध्वनी निघणें, डोळ्यांस झांपड मूर्छा, बडबड, श्वास, अरुचि, खोकला, भ्रम, जीभ भाजल्यासारखी व काळी रखरखीत होणें, अंग विकळ, रक्त, कफ, व पित्त यांनीं मिश्रित असा वारवार थुंका यणें, मस्तक डुलल्यासारखें होणें, तहान, निद्रा नाश, उरांत दुःख, घाम, मळ, मूत्र हीं फार वेळांनीं होणें, व थोडी थोडी होणें, गळा वाजतो, काळसर, तांबूस, वर्तुळ अशा अंगावर गांधी येणें, बोलवत नाहीं, मुख, नाशिका व कर्ण, यांचा पाक, पोटाला जडपणा, आणि वातादि कुपित दोषांचा कालें करून पाक होणें, हीं लक्षणें कमी अधिक प्रमाणानें सन्निपात ज्वरांत होतात.

साध्यासाध्य लक्षण—वात पित्त, आणि कफ, ह्यांची वृद्धि झाली असतां, जठराग्नि नष्ट झाला असतां, व सन्निपाताचीं लक्षणें सर्व झालीं असतां, असाध्य जाणावा. कांहीं कमी असल्यास साध्य होतो.

सन्निपातांत धातुपाक लक्षण—निद्रा नाश, हृदय ताठल्यासारखें होणें, मलमूत्रांचा अवष्टंभ, शरीराला जडता, अन्नद्वेष, अस्वस्थपणा, आणि दलाचा नाश इत्यादि लक्षणें होतात.

मलपाक लक्षण—दोषांचा स्वभाव पालटणें, ज्वर हलका होणें, शरीर हलकें होणें, इंद्रियांस निर्मलता, इत्यादि धातुपाक, मलपाक होणें, हे केवळ दैवावर आहे. या विषयीं दुसरें कांहीं कारण नाहीं.

दोष जनित सन्निपाताची काल मर्यादा—७।९ ११ या तीन मर्यादा अनुक्रमें वात, पित्त, कफ-यांच्या जाणाव्या. ह्मणून त्या त्या दिवशीं धातुपाक झाला तर रोगी मरतो. आणि त्याच मर्यादेंत मल, पाक झाल्यास वांचतो.

सन्निपाताची काल मर्यादा—७।९।११।१४।१८ २२ व्या दिवशीं जास्त होईल तर तो रोगी या दिवसांच्या मर्यादेंत मरेल. आणि मर्यादा चुकली तर वाचेल.

## सन्निपाताविषयीं ध्यानांत ठेवण्याजोग्या सूचना.

१ सन्निपात रोग्याला साळीच्या भाताच्या लाह्याचें पीठ सैंधव घालून द्यावें. तें निर्विघ्नपणें जिरलें तर रोगी निश्चयानें जगेल. लाह्याचें पीठ फार शीत आहे म्हणून तें नुसतें देऊं नये. २ सन्निपात ज्वरितानें पूर्वी लंघन करावें. ३ प्रथम नुसत्या पाण्याचा अष्टमांश काढा करून मंदोष्ण द्यावा. ४ वेळच्यावेळीं औषध द्यावें. ५ तापविल्यावांचून पाणी कधींही देऊं नये. ६ मद्य दिल्यावर त्यावर शीतोपचार केले पाहिजेत. आणि सन्निपातास शीतोपचार विरुद्ध आहेत; आणि मद्यास उष्णोपचार विरुद्ध आहेत म्हणजे विषासमान आहेत. संपूर्ण सन्निपातास मद्य कधींही देऊं नये; हें ध्यानांत असावें. ७ सन्निपातास आम व कफ नाशक औषध पूर्वी द्यावें, कफ क्षीण झाल्यावर पित्त शमवावें. ८ जों पर्यंत लंघन सहन होत आहे तों पर्यंत रोग्याच्या अंगीं दोष आहेत. असें समजावें. कारण दोष गेल्यावर लंघन सहन होत नाहीं. तरी कफ, पित्त हे द्रव धातु आहेत म्हणून रोग्यास आमदोष गेल्यावरही मोठें लंघन सहन होतें; परंतु वायूला मोठें लंघन क्षणमात्र सहन होत नाहीं.

एका औषधाचा गुण न आल्यास दुसरें औषध द्यावें; पण पहिल्या दिलेल्या औषधाचा वेग कमी झाल्यावांचून दुसरें औषध देऊं नये. दिल्यास हितकारक होत नाहीं. सन्निपात ज्वरांत रोग्यास मांस खाण्यास कधींही घालूं नये. कोणी घालील किंवा

सांगेल तर तो रोग्याचा घात करणारा आहे असें समजावें.

सन्निपातांत कफ, वात व पित्त या प्रत्येक दोषाच्या उल्बणापासून ३ व दोन दोन दोषांच्या उल्बणा पासून ३ व तिन्ही दोषांच्या उल्बणाचा १ एकूण ७ आणि प्रवृद्ध, मध्य, हीन जे वात, पित्त, कफ दोष यांच्या पर्यायानें ६ मिळून सन्निपाताचे १३ प्रकार होतात.

सन्निपात रोग्याच्या सर्व भावना व चिन्हें काळजी पूर्वक तपासून टिपून घ्यावी. आणि पुढें लिहिलेल्या उपायांपैकीं जे उपाय लागू पडतील ते करावे खचित यश येईल.

---

## १७ सन्निपात ज्वराबद्दल दुसरीं मतें.

१ दोष वाढलेले आणि अग्नि अति मंद असें असून संपूर्ण लक्षणांनीं युक्त असा सन्निपातज्वर असाध्य समजावा. याहून भिन्न प्रकारचा असेल तर कष्टसाध्य होतो.

२ सन्निपातज्वरांत कर्ण मूळांत मोठी सूज उत्पन्न होते, त्यांतून एकादाच जगतो. ( कर्ण मूळावर औषधें पुढें आहेत. )

३ पित्ताधिक्य असल्यास १० दिवसांनीं, कफाधिक्य असल्यास १२ दिवसांनीं, वाताधिक्य असेल तर ७ दिवसांनीं, धातुपाक झाल्यास मारील. व मलपाक झाल्यास वांचेल.

४ सात, दाहा, बारा दिवसांनीं सन्निपातज्वर अति घोर होऊन एकादेवेळीं शांत होतो किंवा मरतो.

५ दाह, भ्रम, घाम येणें, तहान लागणें, कंप, विट्भेद ( मळ पातळ होणें. ) भान नसणें, कण्हणें, अंगास घाण येणें हीं लक्षणें झालीं असतां ज्वर निघतो, असें समजावें.

६ सन्निपातांत प्रथम आम व कफ घालविणारे औषध द्यावें. कफ कमी झाल्यावर पित्त व वात घालविणारें औषध द्यावें.

७ आरंभीं, लंघन, वाळूची वाफ, नस्य, ओकारी येण्याचें औषध, अवलेह, अंजन इतके उपाय करावें.

८ ३।५।१० दिवसांनीं आरोग्य वाटेपर्यंत लंघन करावे. हें सन्निपातज्वरास हितकारक आहे.

९ लंघन म्हणजे कांहींच न खाणें असें आहे तरी ते येथें लागू होत नाहीं; कारण एक दिवसाच्या लंघनानेंच जर जीव व्याकूळ होतो तर ९ दिवस लंघन कसें सहन होईल ? करितां प्रथम १ दिवस नुसत्या पाण्याच्या अष्टमांश काढ्यानें घालवावा. दुसऱ्या दिवसापासून औषधियुक्त पेज, यवागु, पातळ कणेरी इत्यादि सोईप्रमाणें द्यावें. मात्र अन्न देऊं नये हें लंघन केल्याप्रमाणेंच आहे. आणि यानें दोषही कमी होतात.

१० कोणत्याही ज्वरांत किंवा सन्निपातज्वरांत प्रथम लंघनच सांगितलें आहे तरी क्षय, वायु, भय, काम, क्रोध, शोक, शाप, श्रम वगैरे यांपासून ज्वर उत्पन्न झाला असल्यास, तसेंच बाल, वृद्ध, गर्भिणी, दुर्बल यांस लंघन वर्ज आहे.

---

## १८ सन्निपातावर उपाय.

१ देवदार, सुंठ, रिंगणीमूळ, डोरलीमूळ, धणे समभाग घेऊन त्यांचा काढा सर्व ज्वरांवर पाचनार्थ द्यावा, तेणें करून ज्वर हलका जातो.

२ कायफळ, नागरमोथे, वेखंड, पहाडमूळ, पुष्करमूळ, जिरें, पित्तपापडा, देवदार, हरीतकी, काकडशिंगी, पिंपळी, किराईत, सुंठ, भारंगमूळ, इंद्रजव, कुटकी, कचोरा, रोहिषगवताचेमूळ, धणे हीं औषधें समभाग घेऊन त्यांचा अष्टमांश काढा करून त्यांत हिंग व आल्याचा रस घालून द्यावा. म्हणजे कर्णमूळ, मान व गळ्याची सूज, कास

श्वास, कफ व वातज्वर, उचकी, हनुग्रह; गलगंड, गंडमाळा, कफापासून झालेला स्वरभेद, मस्तकाची जडता, बहिरेपणा, कफ व मेद यांची वृद्धि, दहा प्रकारचे ज्वर, संज्ञानाश, सन्निपात, अभिन्यास, ह्यांचा नाश होतो. हा काढा मृत्युतुल्य ज्वराचा नाश करतो यांत संशय नाहीं.

३ काडेचिराईत, देवदार, दशमुळें, सुंठ, नागरमोथे, कुटकी, इंद्रजव, धणे, गजपिंपळी, यांचा काढा घ्यावा. ह्मणजे, झांपड, बडबड, खोकला, अरुचि, दाह, मोह, दमा यांनीं युक्त ज्वराचा नाश करितो. हा काढा मृत्युतुल्य ज्वराचा नाशक आहे. यात संशय नाहीं.

४ रासना, हिरडेदळ, डोरलीमूळ, रिंगणीमूळ, निर्गुडीमूळ, पहाडमूळ, वेखंड ह्यांचा काढा करून त्यांत मासभर गुगुळ घालून घ्यावा. ह्मणजे सन्निपात, घाम, शैत्य, बडबड, शूळ. दमा, कफ, बाळंतरोग, ह्यांचा नाश होतो.

५ कोणत्याही उपायाने सन्निपात हटला नाहीं तर मनुष्याच्या किंवा गोमुत्रांत लसूण आणि सोनें घालून काढा करून ३ तोळे सुमार वयमान पाहून द्यावा. हें फार तीव्र औषध आहे. पण हटकून गुण देणारें आहे.

६ बोरी, कवठ, उंबर, कडुनिंब आंबळी, आपटा, जांबळी, ह्यांचा पाला २।२ तोळे घेऊन ४० भार पाणी घालून अष्टमांश ह्मणजे ५ तोळे काढा उरला ह्मणजे गाळून थंड झाल्यावर मध घालून पाजावा. रात्रीं निकाढा द्यावा. दि. ७

७ सन्निपातज्वरांत जिभेस कांटे आल्यास–सोनामुखी ( भुईतरवड ) याचें वस्त्रगाळ चूर्ण करून मधांतून थोडें थोडें जिभेस चोळावें. कांटे व रुक्षता जाऊन जीभ नरम पडते.

८ सन्निपातज्वरास चाटण — सोनें, रुपें, रुद्राक्ष, पोंवळें, मोतीं, कमलाक्ष, पुत्रवंती, ( पुत्रवंती ह्मणून वेल असतो त्याचें प्रत्येक पानाच्या बुडख्यास फळ लहान भोंकरा येवढें असतें. ) रेशमाची राख, खारकेची बी, जेष्टमध हीं सर्व किंवा मिळतील तितकीं मधांत उगाळून वरचेवर २।३ तासांनीं चाटवावें.

९ सन्निपातज्वरांत जीभ काळी होते त्यास— शिकीकाई, जेष्टमध हीं बाभळीच्या पाल्यांत वाटून त्यानें जीभ घासावी. काळेपणा जातो व मऊ होते.

१० वायू होऊन दांतखिळी बसते त्यास— पंदे ह्मणून गवत असतें त्याचे तुरे ( कणसें ) धोत्रास चिकटतात ह्मणून त्यास कुत्रेगवत ह्मणतात त्याचे तुरे आणून ठेवावे. कारण परत्वें २ तोळे तुरे घेऊन १ शेर पाण्यांत घालून त्यांत २।३ तोळे वजनाचा भरीव सोन्याचा तुकडा किंवा जिन्नस ( वाळे, कडे, सलकडे, अष्टपैलु, जोडवें, पाटली वगैरे ) घालून अष्टमांश काढा करून ५ तोळे उरला म्हणजे दिल्यास १ प्रहरांत शुद्धीवर येईल. परंतु पुनः कारण पडल्यास २।३ वेळां द्यावा.

११ वायूचा झटका आल्यास––रुईच्या मुळास लागलेली माती घेऊन ती रुईच्या चिकांत खलून वाळवून बारीक चूर्ण करून ठेवावें. प्रसंगीं कागदाच्या नळींतून नाकांत फुंकावें. रोगी सावध होईल. नंतर लसणाच्या कुड्या १ तोळा, मिरे १ तोळा ह्यांचा अष्टमांश काढा करून त्यांतील १ तोळा निवाल्यावर मध घालून द्यावा. व त्यांतीलच उरवून सायंकाळीं द्यावा. दि० ३

१२ वायु होऊन दांतखीळ बसल्यास—१० पंचपात्र पाणी घालून एक पंचपात्रभर आटवून उरल्यावर मग त्यांत मोत्याच्या शिंपाचें भस्म ४ गुंजा भार घालून थोडें थोडें पाजावें. एक घटकेंत बरें होतें.

---

१३ त्रिदोष वातास–शुद्ध हिंगूळ १ शुद्ध रसकापूर १ रससिंधुर १ उत्तम मध ३ शुद्ध गंधक ३ या प्रमाणें भागवार घेऊन कढईंत मध प्रथम घालून त्यांत गंधक खलून एक जीव झाला म्हणजे वरील तिहींची पूड टाकून उलथन्यानें घोटावें. मध, गंधक

जळाल्यावर खालीं उतरून त्यावर पिंपळाच्या मुळीचा कीस ओला घालून दाबून ठेवावें. २ घटका नंतर काढून खलांत घालून खलून कुपींत भरून ठेवावें. वायु व त्रिदोष ज्वर यांस अनुपान योजून द्यावें उत्तम गुण येईल.

१४ मार्तंड भैरव--शुद्ध पारा १ भाग, शुद्ध बचनाग १ भाग, चित्रकाच्या मुळीच्या रसांत ३ दिवस खलून नंतर गोळा करून कापड मात करून वालुका यंत्रांत ठेवून आंच द्यावी. ४ घटका झाल्यावर एक काडी घेऊन वाळूंत पुरावी पेटल्यास औषध तयार झालें असे समजावें. मग स्वांगशीत झाल्यावर, उतरून काढून ठेवावें. व अनुपान परत्वें द्यावें. मध पिंपळीशीं दिलें असतां सन्निपात वायु, सर्व सूज, पांडुरोग, अर्ष रोग, वात रोग, हलीमक, वातरक्त, व जलोदर वगैरे, सर्व उदरें, सर्व शूळ, उदर शूळ, कपाळ शूळ, इतके रोग जातात. पथ्य. रोगाच्या मानानें ठरवावें.

१५ सन्निपातावर मृत्युंजय रस--शुद्ध हिंगूळ ५ तोळे, व सोललेला ५ तोळे लसूण घेऊन कुटून त्यांच्या लुगदींत भरावा, व चुलीवर खापरांत ठेऊन लसूण जळाल्यावर हिंगूळ काढून खलून पुन: लसणीच्या लुगदींत भरून पुनः खापरांत लसूण जळेपर्यंत भाजून काढावा. या प्रमाणें पक्का अच्छेर म्हणजे ४० तोळे खपल्यावर शोधून कुपींत भरून ठेवावा. एक गुंज भार घेऊन आल्याच्या, लसणीच्या रसांत मध घालून देणें. दांतखीळी बसली असली तरी उतरेल.

१६ त्रिधारी निवडुंगाचा सोट जाळून भस्म करून तीन बोटाच्या चिमटीभर घेऊन ऊन पाण्यांतून द्यावें. सन्निपात व नाळगुद जातें.

१७ घोर सन्निपातास आनंद भैरव--- हिंगूळ, ताम्रभस्म, टांकणखार, गंधक, चित्रक, बचनाग, काळ्या धोत्र्याचें बीं, सम भाग घेऊन माक्याच्या रसांत ७ भावना द्याव्या. व ७ दिवस खलावें. मात्रा गुंज प्रमाण कराव्या. आणि रुईच्या मुळाच्या काढ्यांत सुंठ, मिरे, पिंपळी, यांचें चूर्ण चिमटीभर घालून एक मात्रा उगाळून द्यावी. घोर सन्निपात वायू व तंद्रा जाते.

१८ नागार्जुन गुटिका--बचनाग, शिसेंभस्म, पारा, गंधक, सुंठ, मिरें, पिंपळी, कलखापरी, समभाग आल्याच्या रसांत खलून गुंज प्रमाण गोळ्या कराव्या. १ गोळी आल्याच्या रसांत उगाळून मध घालून द्यावी. सन्निपात, त्रिदोष वायु, संधिगत वायु, जाईल. पथ्य दहीं भात, ताक भात.

१९ व्याधिशेखांवर रस--पारा, गंधक, टांकणखार, त्रिकटु, जेपाळ, समभाग खल करून त्रिफळ्याच्या काढ्यानें खलावें. ३ दिवस खलून मात्रा वाल प्रमाण घेऊन १ तोळा साखरेंतून द्यावी. सर्व ज्वराचा विरोध होईल. याच मात्रेनें पाण्यांत उगाळून अंजन केल्यास मरत असला तरी २ घटका वांचेल.

२० सन्निपातज्वर व नवज्वर- काळा चित्रक १ तोळा, सुंठ, मिरे, पिंपळी १।१ तोळा, रुईच्या फुलांतील मगज असतो त्याच्या रसांत व शेवग्याच्या रसांत खलून गोळ्या हरभऱ्या येवढ्या कराव्या. रोज दोहीं वेळां १।१ गोळी आल्याच्या रसांत उगाळून मध किंवा साखर घालून द्यावी. पथ्य कुळथ्याचें माडगें ऊन पाणी.

२१ चंडमार्तंड रस--त्रिदोषवात, सन्निपातास--लोहभस्म, गंधक, हिंगुळ हीं शुद्ध समभाग घेऊन लोखंडी पळींत घालून पळी दिव्यावर धरून गंधक वितळल्यावर काढून तें भस्म गुंज प्रमाण औषध आल्याचा रस, मध, लसण्याचा रस, ह्यांत देणें. अथवा आलें किंवा सुंठ, काळिंजन, ओवा, पिंपळमूळ, शेवग्याची साल हीं पाणी घालून वाटून रस काढून ऊन करून देणें

२२ देवदार, हळद, आंबे हळद, कडूनिंबाच्या काढ्या, त्रिफळा, नागरमोथे, कुटकी, कडूपडवळ

यांचा अष्टमांश काढा करून घेतला असतां घोर सन्निपाताचा नाश होतो.

२३ त्रिकटु, त्रिफळा, कुडा, केदारकुटकी, पित्तपापडा, निंब, गुळवेल, चिराईत, कडूपडवळ, कुटकी, धणे, नागरमोथे, अडुळसा प्रत्येकी पाव तोळा प्रमाण घेऊन अष्टमांश काढा करून निवाल्यावर मध घालून पाजावा. दि. ७ दोहीं वेळां. घोर सन्निपात जाईल.

२४ सन्निपात वायूवर अंजन--मिरें, सिरस, वावडिंग, वेखंड, कोष्ट, तुळस, बोकडाच्या मुतांत खलून गोळी करून ठेवावी. पाण्यांत उगाळून अंजन करावें. सन्निपातवायु उतरतो.

२५ अंजन दुसरें--पारा, कळीचा चुना, सुताराच्या घरांतील घरोसा, हीं प्रत्येकीं अर्ध तोळा, शुद्ध जेपाळ ३ तोळे, मिरें २ तोळे, येरंड्या सोलून ३ तो० सर्व चूर्ण करून प्रथम पारा व चुना खलून नंतर सर्व मिसळून आंबट लिंबाच्या रसांत खलून बारीक जोंधळ्या येवढ्या गोळ्या कराव्या. १ गोळी लिंबाच्या रसांत उगाळून अंजन करावें. म्हणजे सन्निपातवायु, उन्मत्तवायु, सर्पविष उतरतें. बाळंतिणीचा नंदवायु उतरतो, शिवाय रातांधळ, डोळ्याचें दुःख, भूतबाधा, शितज्वर हीं निश्चयानें जातात.

२६ तंद्रा किंवा मूर्छा आल्यास--कस्तूरी व मिरें घोड्याच्या लाळेंत उगाळून अंजन करावें.

२७ वायू होऊन बेशुद्ध झाल्यास--पांढरा कांदा भाजून मधोमध चिरून ऊन असतांच दोन्ही कानाशिलावर २ फाका ठेवून फडक्यानें घट्ट बांधावें. म्हणजे मनुष्य शुद्धीवर येतो, हा एक प्रकारचा डागच आहे.

२८ उत्तम हेमगर्भ, वातविध्वंस, प्रतापलंकेश्वर, महामृत्युंजय, पंचसूत ह्यांपैकीं एकादी मात्रा आल्याच्या रसांत व मधांतून चाटावी.

२९ सन्निपात ज्वरावर उत्तम काढा--कुटकी, किराईत, पित्तपापडा, गुळवेल, कचोरा, रासना, पिंपळी, कमळकंद, मेंदी, रिंगणीमूळ, देवदार, सुंठ, हिरडेदळ, धमासा, ब्राह्मी यांचा काढा करून अष्टमांश उरला म्हणजे गाळून द्यावा. म्हणजे त्रिदोषज्वर, दिवानिद्रा, रात्रीं जागर, तृषा, खोकला, शोक, दाह, दमा, यांस घालवितो. यात्र काढ्यांत मध आणि पिंपळी घालून घेतलां असतां जीर्णज्वर व विषमज्वर हे जातात.

३० आडुळशाच्या पिकल्या पानांस वाफ देऊन रस काढून त्यांत आल्याचा रस व तुळशीचा रस घालून त्यांत जेष्टमध उगाळून व मध घालून द्यावें.

३१ दशमुळें, त्रिफळा, त्रिकटू, किराइत, गुळवेल, देवदार, बाळहिरडे, पिंपळी, हळद, दारुहळद, येरंडबीज, रास्ना, रुईचे मूळ, वावडिंग, कुटकी प्रत्येक चवली चवली भार घालून ४० तोळे पाणी घालून अष्टमांश काढा करून गाळून द्यावा रात्रीं निकाडा द्यावा. घोर सन्निपाताचा नाश करतो.

३२ सन्निपात ज्वरांत मूर्छा येते त्यास--दारुहळद, नागरमोथे, कुटकी, त्रिफळा, रिंगणीमूळ, कडूपडवळ, हळद, कडूनिंब, ह्यांचा काढा द्यावा.

३३ अंजन--सिरस, गोमूत्र, पिंपळी, मिरें, सैंधव, लसूण, मनशीळ, वेखंड सर्व समान घेऊन १ दिवस खलून गोळ्या करून ठेवाव्या. याचें अंजन केल्यानें शुद्धि गेली असल्यास येते.

३४ नस्टा--मोहाचा डिंक, सैंधव, वेखंड, मिरें, पिंपळी, समभाग घेऊन खलून पाण्यांतून नाकांत थेंब सोडावे. बेशुद्ध झालेला मनुष्य शुद्धीवर येतो.

३५ कायफळ, मोखरमूळ, काकडशिंगी, पिंपळी, मध, यांचा लेह करून चाटवावा. म्हणजे श्वास, खोकला, ज्वर, कफ ह्यांचा नाश होतो.

३६ भारंगमूळ, किराइत, कडूनिंब, नागरमोथे, कुटकी, वेखंड, सुंठ, मिरे, पिंपळी, अडुळसा,

कडूवृंदावन. रासना, धमासा, कडूपडवळ, देवदार, हळद, पांढरी पाडळ, टेंभुरणा, ब्राम्ही, दारुहळद, गुळवेल, तेड, अतिविष, पोखरमूळ, मेदी, वाचांटी, डोरली, इंद्रजव, हिरडा, बहडा, आवळकाठा, कचारा समभाग घेऊन काढा करावा याला बत्तिशा काढा म्हणतात. हा काढा तेराही सान्निपात, शूळ, खोकला, उचकी, श्वास, गुदरोग, आध्यान, उरुस्तंभ, अंत्रवृद्धि, गलरोग, अरुचि, सर्व संधिग्रह यांचा नाश करितो.

३७ किराइत, लसूण, कांडवेल, भारंगमूळ, अतिविष, समभाग घेऊन त्याचा काढा गोमूत्रांत करून द्यावा. हा फार तीक्ष्ण आहे.

३८ ज्वरांत जीभेवर कांटा आल्यास किंवा जीभ फुदकळ झाल्यास--मनुका मधांत खलून तूप घालून चोळावें. बरी होते.

३९ गळयास सूज आल्यास--सुंठ, देवदार चित्रक, रासना यांचा लेप करावा. सूज उतरेल.

४० कफ दाटल्यास--आल्याचा रस, सैंधव, सुंठ, मिरे, पिंपळी, यांची गोळी खडीसाखरेच्या पाकांत करून तोंडांत धरावी. यानें वरचेवर खाकरा येतो तो थुंकावा. म्हणजे कुशींत, उरांत, मानेंत, घशांत, मस्तकांत जमून अडकलेला कफ बाहेर निघून शरीर हलकें होतें.

४१ दशमूळाच्या काढ्यांत साळीच्या लाह्या घालून थंड करून द्यावा. म्हणजे पाचन, दीपन, व उष्णता होऊन सन्निपातास कमजोर होतो.

४२ धमासा, गोखरू, रिंगणी ह्यांच्या काढ्यांत सिद्ध केलेला आहार द्यावा. म्हणजे दोषांची शांति होते, व बळ, अग्नि ही वाढतात. त्रिदोषी रोग्यास हित होते.

४३ अर्धनारी नटेश्वर—पारा, गंधक, बचनाग, टांकणखार, हीं सर्व शुद्ध घेऊन खलून कज्जली करून एका विषारी मेलेल्या सर्पाच्या तोंडांत घालून एका मडक्यांत खालीं वर मीठ घालून मध्यें सर्प ठेऊन मडक्याच्या तोंडावर झांकण घालून बंद करून ४ प्रहर तीव्र अग्नि द्यावा. नंतर स्वांगशीत झाल्यावर औषध काढून खलून ठेवावें. अर्धी किंवा पाव गुंजभर औषध एका नाकपुडींत घातल्यास एकाच अंगातील ज्वर जातो. दोन्ही नाकपुड्यांत घातल्यास सर्व अंगाचा ज्वर जातो. अर्ध घटकेंत ज्वर जातो. परंतु पुढें ८ दिवस रोग्यानें स्वस्थ पडून रहावें. व पथ्य संभाळावें.

## १९. सन्निपातज्वरांत वायु होतो त्यावर.

१ शेवग्याच्या सालीचा रस, माक्याचा रस, निर्गुंडीचा रस, तुळशीचा रस, आल्याचा रस प्रत्येकीं अर्ध अर्ध तोळा घेऊन त्यांत वातविध्वंस मात्रा गुंज भार उगाळून मध घालून देणें.

२ सन्निपात ज्वरास मात्रा--कस्तुरी, केशर, लवंगा, जायफळ, पिंपळी समभाग घेऊन आल्याच्या रसांत १० प्रहर खल करावा. गोळ्या २ गुंज प्रमाण करून शक्तिमान व वयमान पाहून गोळी अर्धी किंवा सगळी आल्याच्या रसांत उगाळून मध घालून द्यावी. एका गोळींतच ज्वर जातो. व वायु उतरतो. सन्निपात ज्वरास ही उत्तम मात्रा आहे.

३ अमृत संजीवनी सर्वांजन--(अनेक वायूवर) जेपाळ १० भाग, मिरे १ भाग, पिंपळी १ भाग, पारा १ भाग यांचा जांबूळ आणि लिंबू यांच्या रसांत पृथक् पृथक् ७ दिवस खलून गोळ्या बांधून ठेवाव्या. कारण पडेल तेव्हां मध व आल्याचा रस अथवा तुळशीचा रस अथवा ऊन पाणी यांत गोळी उगाळुन अंजन करावें.

४ सोन्याचा वर्ख पानें १० हरणाच्या कच्या शिंगाचे तुकडे अर्ध तोळा. येरंडमूळ २ तोळे, सुंठ १ तोळा, पाणी १२० तोळे, यांचा अष्टमांश काढ करून गाळून एका कुपींत ठेवावा. (काढा तारेच्या

चाळणींतून चाळून द्यावें. ) बेशुद्ध झालेला, बडबड करणारा, दांडगाई करणारा, अशा सन्निपात ज्वरांतील रोग्यास १॥–१॥ तामाच्या फेरानें ३ वेळ पाजल्यास सर्व चिन्हें थांबतात. कांहीं बदल न दिसल्यास मध्यें १ प्रहर थांबून पुन्हा काढा द्यावा हा प्रयोग अनुभव सिद्ध आहे. वर्खाऐवजीं कोणी पाटल्या किंवा पुतळ्या घालतात, पण वर्ख घालणें अधिक गुणावह आहे.

५ संज्ञा प्रबोधांजन--समुद्रफळ, रिठे, भूतकेशी, तिळवणीचें बीं, मोरचूद, समभाग वस्त्रगाळ चूर्ण नाकांत फुंकावें, वायु झालेला मनुष्य शुद्धीवर येतो. आणि सन्निपात, श्लेष्मा, शिरोव्यथा जाते. अंजनही करावें.

६ त्रिमूर्तिरस--भारंगमूळ १६ भाग, कळलावी ८ भाग, बचनाग ४ भाग, पारा १ भाग, गंधक १ भाग आल्याच्या रसात ७ दिवस खलून २ गुंजा प्रमाणें गोळ्या बांधून चित्रक, पिंपळी, मध यांतून द्यावी. पथ्य मुळींच नाहीं. दहीं भात, साखर, थंडपाणी, ताकभात खाणें, स्नान करावें. १३ प्रकारचे सन्निपात. उदरशूळ, सूज, सामनिरामज्वर, तरूणज्वर, जीर्णज्वर हीं जातात.

७ भिरजोळांच्या पचांगाचा काढा करून त्यांत पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा.

८ अंजन--कागदी लिंबू फाडून त्यांत जेपाळ बी व मिरें भरावीं नंतर तें लिंबू बांधून जमीनींत २ महिने पुरून ठेवावें. मग काढून पुन: लिंबू रसांत खलून लांबोड्या गोळ्या करून ठेवाव्या. प्रसंगी आलें व लिंबू रसांत खलून अंजन करावें. म्हणजे उन्माद वायु, सान्निपात, अपस्मार, पटकी, थंडी, फार घाम येणें, सर्पदंश हीं शमतात.

९ प्रताप लंकेश्वर--अघाड्याचीं व चित्रकाचीं मुळें, ओलीं आणून त्याचा रस काढून त्यांत शुद्ध पारा, अभ्रकभस्म, शुद्ध हिंगुळ, शुद्ध हरताळ व टांकणखार यांचे ७ दिवस पर्यंत मर्दन करावें. नंतर मुसळीच्या रसाच्या तीन भावना द्याव्या, व उन्हांत वाळवावें, मग लांबट द्राक्षाच्या आकाराची कांच कुपी घेऊन तींत तें भरावें. त्यास सातमात कापडे करून लघुपुट देऊन शुष्क करून पाऱ्या इतकेंच रौप्य भस्म, ताम्रभस्म, कथील भस्म, लोह भस्म घेऊन मोहाचा नार, नागरमोथे, चित्रक, गुग्गूळ, शिलाजित, चुका हीं समभाग घेऊन व त्याच्या अर्ध भाग बचनाग शुद्ध घेऊन त्याच्या काढ्याची व सुठ मिरें, पिंपळी, यांच्या काढ्याची व धोतऱ्याच्या रसाचा त्रिफळाच्या काढ्याची अगस्त्याच्या रसाची व माशाच्या पित्ताची, अशा ७ भावना द्याव्या. नतर बचनागाचा धूप द्यावा. नतर समुद्र फळाचा अघाड्याच्या बिजाचा काढा, चित्रकाचा काढा, तिळवणीचा रस यांत मर्दन करून गुज प्रमाणें गोळ्या कराव्या. १ गोळी चित्रकाचा रस व आल्याचा रस यांतून द्यावी. तीव्र वेड व विस्मृति, यांचा नाश होतो. शस्त्रानें टाळूस ब्रह्म रंध्राच्या ठायीं छेद करून गोळीची पूड आल्याच्या रसाशीं मर्दन करावी हा प्रकार दांतखीळ बसल्यास करावा. मस्तकावर थंड पाणी पुष्कळ ओतावें. पंख्यानें वारा घालावा भोजनाची इच्छा असल्यास दहींभात साखर द्यावी. जिऱ्याची पूड घालून ताक पिण्यास द्यावें. असें केल्यानें पाऱ्यापासून झालेला दाह शांत होतो. चंदन कापुराची उटी करावी. संपूर्ण वातरोगास ही गोळी सैंधव, चित्रक व गुग्गुळांतून द्यावी. कामला, क्षय, पांडुरोग यांस पिंपळी, सुवर्ण माक्षिकांतून द्यावी व सर्व रोगांवर रोगोक्त अनुपानांतून द्यावी. हा प्रतापलंकेश सर्व सन्निपातावर प्रशस्त आहे.

---

## २० कर्णमूळ.

**लक्षण**—सान्निपांत ज्वरांत किंवा ज्वरा नंतर कानाच्या मुळांत गांठ किंवा सूज उत्पन्न होते त्यास कर्ण मूळ म्हणतात. ही सूज किंवा गांठ प्राणघातक

आहे. यांतून क्वचितच जगतो. ही सूज किंवा गांठ ज्वराच्या पूर्वी आल्यास साध्य होते. ज्वरामध्यें आल्यास कष्टसाध्य. ज्वरा नंतर आल्यास असाध्य.

### कर्णमूळावर उपाय.

१ रासना, सुंठ, महाळुंगाचें मूळ, दारुहळद, व टांकळा मूळ पाण्यांत उगाळून लेप करावा, यानें कर्णमूळाचा नाश होतो.

२ कर्णमूळ फुटण्यास उपदंश प्रकरणांत बदावर जीं जीं औषधें सांगितलीं आहेत तीं करावीं.

३ हिंग, हळकुंड, इंद्रावारुणी, सैंधव, देवदार पिंपळी, यांचें चूर्ण रुईच्या चिकांत खलून त्यांत तूप घालून घोटून लेप करावा. लवकर बरें होतें.

४ वेखंड १ पैसाभार, लसूण बिया १० एकत्र वाटून लेप देणें. तीन लेपांत जातें.

५ कांचनाच्या सालीचा काढा करून पाजावा. व सुंठ व बचनाग यांचा गांठीवर लेप करावा.

६ गूळ, गुग्गूळ, चित्रक, मोहऱ्या, पाण्यांत वाटून लेप करावा.

७ पांढऱ्या फुलाचा गुलबाशीचा गड्डा किसून २ बिबे घालून वाटून तुपांत शिजवून उतरतेवेळीं गूळ घालून सुपारी येवढ्या गोळ्या करून रोज दोहीं वेळां खाव्या. यांस वर्ज्य पदार्थ--हिंग, मोहऱ्या वालाच्या शेंगा, किंवा वाल, तेल, तिखट, आंबट वर्ज. ( हे तेलंगी घनपाठ्याचें औषध आहे. )

८ जळवा लावून रक्त काढावें. त्यामुळें ग्लानि आल्यास तूप पाजावें.

९ चिंचेचा बलक तापवून, लोणा असेल त्या जमिनीवर ओतावा व त्याचा लेप कर्णमूळावर द्यावा.

१० बचनाग लिंबू रसांत उगाळून लेप द्यावा.

११ गांठीवर पोटीस बांधून पिकवावें, आणि फुटल्यावर जुनें तूप अगर मलम, वातीस लावून छिद्रांत घालीत असावें. म्हणजे पुवाचा निचरा होऊन भरून येते जर आंत दोष राहिल्यास पिकून छातींत उतरते किंवा नाकांतून वाहूं लागतें.

१२ सन्निपात ज्वरांतील दुसऱ्या अंकाचा कायफळादि काढा द्यावा.

१३ लेपानें कर्णमूळ न बसतां सूज मोठी झाली तर रक्त काढावें. गांठ पिकल्यास फोडून त्यास व्रण चिकित्सा करावी.

१४ शेवग्याची साल, मोहऱ्या वाटून कर्णमूळावर लेप करावा. यानें कर्ण मूळाची गांठ व सूज जाते.

१५ प्रथम कर्णमूळाच्या सुजेस जळवा लावून रक्त काढावें, नंतर दुसरे दिवशीं सकाळीं त्या सुजेवर मोहऱ्या, सैंधव, वेखंड, धेरोसा, सुंठ, हळद, पाण्यांत वाटून लेप द्यावा. म्हणजे सूज व्रण व ठणका जातो.

---

## २१ वातोल्बण सन्निपात

लक्षण--( योगतरंगिणी ) ज्वर, तृषा, ग्लानि, पार्श्वभागीं शूळ, डोळयानें न दिसणें, पोटऱ्या व मांड्या दुखणें, न गळपटल्यासारखें होणें, दाह, कमी बल, तोंड व मलमूत्र तांबडें, शूळ, निद्रानाश गुदाचा भेद, मूत्राशय आकुंचित होणें, अंग भेद विलाप, मुर्छा, ओरडणें, रडणें, हीं लक्षणें होतात. व यांत वात अधिक असतो.

### वातोल्बण सन्निपातावर उपाय.

१ सन्निपातावर २ अंकांत काढा (कायफळादि) लिहिला आहे तो घ्यावा.

२ रुइचें मूळ, धमासा, देवदार, किराईत, रासना, निर्गुडीचा पाला, वेखंड, टाकळा, शेवग्याची साल, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, मिरी, सुंठ, अतिविष, माका, ह्यांचा काढा सन्निपात, धनुर्वात,

दांतखिळी, घाम, श्वास, बाळंतरोग, यांचा नाश होतो.

३ नागरमोथे, व पंचमूळें, यांचा काढा करून तो दोषांचें बल असतां गरम, व दोष असतां सुखोष्ण असा द्यावा.

४ भारंगमूळ, किराईत, कडूनिंब, नागरमोथे, वेखंड, सुंठ, मिरें, पिंपळी, अडुळसा, इंद्रावारुणी मूळ, रासना, धमासा, पटोल देवदार, हळद, पाडळ मूळ, टेंटु, ब्राह्मी, दारुहळद, गुळवेल, निशोत्तर, अतिविष, पुष्करमूळ, त्रायमाण, पाहाडमूळ, रिंगणीमूळ, इंद्रजव, त्रिफळा, कचोरा, कुटकी, यांचा काढा द्यावा. म्हणजे सर्व प्रकारचे सन्निपात, व मन्यास्तंभ व गुदामय, व हिक्का, भ्रम, मुर्छा, शीत, श्वास, बलास, कास, वायुहृद्रोग, मलावष्टंभ, यांचा नाश करितो.

## २२ पित्तोल्बण सन्निपात.

**लक्षण**--यांत पित्ताधिक्य असतें, मलमूत्र लाल, दाह, घाम, बलक्षय, आणि मुर्छा, हीं लक्षणें, होतात. यांत शीतोपचार केला असतां कफ वायु, यांचा कोप होऊन उचकी, श्वास, डोळ्यांवर झांपड, हीं लक्षणें वाढतात.

### पित्तोल्बण सन्निपातावर उपाय.

१ कचोरा, पुष्करमूळ, रिंगणीमूळ, काकडाशिंगी धमासा, इंद्रजव, कडूपडवळ व कुटकी, यांचा काढा द्यावा.

२ किराईत, नागरमोथे, पहाडमूळ, सुंठ, वाळा, कमळाचीं बिसें, यांचा काढा थंड करून द्यावा.

३ फालसा, त्रिफळा, देवदार, कायफळ, चंदन, पद्मकाष्ट, कुटकी, आणि पिठवण हीं एकत्र कुटून रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं काढा करून निवाल्यावर द्यावा. पित्ताधिक सन्निपातास हा काढा योग्य आहे.

४ चंदन, पद्मकाष्ट, कुटकी, पिठवण, हीं औषधें समभाग ठेंचून थंड पाण्यांत भिजत घालून सकाळीं गाळून तें पाणी प्यावें. म्हणजे पित्ताधिक सन्निपाताचा नाश होतो.

## २३. कफोल्बण सन्निपात.

**लक्षण**—यांत कफदोष जास्त असतो. आळस, अरुचि, मळमळ, दाह, वांति, चैन न पडणें, भ्रम, झांपड आणि खोकला, हीं लक्षणें असतात.

### कफोल्बण सन्निपातावर उपाय.

१ रिंगणी, डोरली, पुष्करमूळ, भारंगमूळ, कचोरा, काकडाशिंगी, धमासा, इंद्रजव, कडूपडवळ, कुटकी, ( याला बृहत्यादि गण म्हणतात ) यांचा काढा निकाढा द्यावा. म्हणजे कफाधिक्य सन्निपात, दमा, आणि सर्व उपद्रवांस नाशक आहे.

२ पिंपळमूळ, देवदार, इंद्रजव, वावडिंग, ब्राह्मी, माका, चित्रक, त्रिकटु, कायफळ, कमळकंद, यांचा काढा करून त्यांत मासाभर गुग्गुळ घालून द्यावा.

३ रासना, हिरडेदळ, डोरलीमूळ, रिंगणीमूळ, निर्गुंडी, पहाडमूळ, वेखंड, चवक यांचा काढा करून माशभर गुग्गुळ घालून द्यावा. यानें सन्निपात, घाम, शैत्य, बडबड, शूळ, दमा, कफ यांचा नाश होतो.

## २४ त्रियुल्बण सन्निपात.

**लक्षणः**– हा संपूर्ण लक्षणांनीं युक्त असतो, ज्वर, अंगमर्द, ताळूचाशोष, इंद्रियांत सामर्थ्य नसणें, पोट फुगणें, डोळ्यावर झांपड, अरुचि, श्वास, कास, श्रम, भ्रम हीं लक्षणें असतात.

### त्रियुल्बण सन्निपातावर उपाय.

१ सुंठ, मिरें, पिंपळी, नागरमोथे, त्रिफळा,

कडूनिंब, कडूपडवळ, कुटकी, इंद्रजव, किराईत, गुळवेल, पहाडमूळ यांचा काढा त्रिदोषांचा नाश करितो.

२ सुंठ, धणें, भारंगमूळ, पद्मकाष्ट, रक्तचंदन, कडूनिंब, कडूपडवळ, त्रिफळा, जेष्टमध, चिकणामूळ साखर, कुटकी; नागरमोथे, गजपिंपळी, बाव्याच्या शेंगेतला मगज, किराईत, गुळवेल, दशमूळें, व रिंगणीमूळ, यांचा काढा दिला असतां मृत्युतुल्यही सन्निपाताचा नाश करितो.

---

## २५ तंद्रा ( झांपड )

**तंद्रा लक्षण**—सन्निपात ज्वरांत तंद्रा उत्पन्न होते. तिला युक्तीनें जिंकावी. हा ज्वरामध्यें कष्टसाध्य उपद्रव आहे. ज्या ज्वरामध्यें आमाशयांत आम आणि कफ यांच्या संचयानें दृढ सन्निपातज्वर होऊन शांत झाल्यावर त्या रोग्यास निश्चयें करून तंद्रा उत्पन्न होते आणि पातळ रस, दूध व दिवसां निद्रा यांच्या सेवनानें दुर्बळ व अल्पायु अशा रोग्याचा कफ कोपतो आणि तो कफ वायूच्या मार्गाला रोधून धमनींत प्रवेश करितो. त्या रोग्याचे डोळे अर्धे मिटलेले, किंवा वटारलेले असून तारका ( डोळयांतील बाहुल्या ) फिरतात, आणि बुबुळ चंचळ असून डोळे गळलेले दिसतात. पापण्या अचंचळ असून तोंड उघडें व दांत बाहेर दिसतात. वरचेवर उताणा निजतो. चिकट व तंतुयुक्त अश्रु स्राव डोळ्यांतून बाहेर येतो, कंठ मार्गाचा रोध होतो. या प्रमाणें लक्षणें होतात. असा प्रकार झाला असतां त्रिरात्रींपूर्वी साध्य होतो. नंतर असाध्य आहे असें समजावें

### तंद्रेवर उपाय.

१ लोहभस्म, पांढरा लोध, मिरीं, व गोरोचन हीं औषधें पाण्यांत उगाळून एकदोन वेळां अंजन करावें.

२ सैंधव, मनशीळ, त्रिकटु हीं मधांत उगाळून अंजन करावें.

३ सुंठ, मिरे, पिंपळी, ही अगदीं काजळा-सारखीं खलून नाकांत फुंकावीं.

४ जाईचें फूल व पाला, मिरीं, कुटकी, वेखंड, सैंधव हे बकऱ्याच्या मुतांत वाटून नाकांत पिळावें अथवा २।३ थेंबाचें नस्य द्यावें. हें तंद्रा नाश करण्याविषयीं उत्तम आहे.

५ आवळे शिजवून वाटावें, आणि त्यांत मनुका सुंठ यांचे चूर्ण घालून मधाशीं द्यावें. म्हणजे खोकला, श्वास, मूर्छा अरुचि हे रोग दूर होतात.

---

## २६ सान्निपाताच्या पोट भेदांचीं नांवें व त्यांच्या दिन मर्यादा.

संधिक ७, अंतक १०, रुग्दाह २०, चित्त विभ्रम २४ शीतांग १५ तंद्रिक २५ कंठकुब्ज १३ कर्णक ९० भ्रग्नेत्र ८ रक्तष्टीवी १० प्रलापक १४ जिव्हक १६ आणि अभिन्यास १५ ही आयुष्याची परमा-वधि सांगितली आहे. परंतु कधीं कधीं रोगी अव्य-वस्थेनें, अथवा गैरसोईनें, अथवा स्थल, काल, द्रव्य, औषध यांच्या अभावी तत्काळही मरतो. एकूण सन्निपाताचे १३ पोट भेद आहेत.

**साध्यासाध्य विचार**—संधिक, तंद्रीक, कर्णक, कंठकुब्ज, जिव्हक, चित्त विभ्रम हे साध्य, व बाकीचे राहिलेले ७ ते कष्ट साध्य व मारक होत.

### १ संधिक सन्निपात.

**लक्षण**—सांध्या सांध्याना सूज, किंवा शूळ, शरीरास वातपीडा, कफ, संताप, बलक्षय, निद्रा नाश हीं लक्षणें होतात.

### संधिक सन्निपातावर उपाय.

१ शुद्ध पारा, गंधक, अभ्रकभस्म, त्रिक्षार,

जिरे, त्रिकटु, त्रिफळा, मीठ समभाग घेऊन चित्रकाच्या काढ्यांत मर्दन करून ४ गुंजा प्रमाण गोळी मध पिंपळी यांत द्यावी. हा संधिकारी रस संधिक सन्निपातास हितावह आहे.

२ पंचमुळें, पिंपळी, सैंधव, सुंठ यांचें चूर्ण कुळथ्याच्या काढ्याबरोबर द्यावें. कुळिथ ( हुलगे )

३ निर्गुंडी, गुग्गुळ, मोहऱ्या, कडूनिंबाची पानें, व राळ यांचा धूप संधिक सन्निपाताचा नाशक आहे.

४ देवदार, कचोरा, गरुडवेल, ( गुळवेल ) रास्ना व सुंठ ह्यांचा काढा गुग्गुळ घालून दिला असतां संधिवात नाश करितो.

५ वेखंड, धमासा, गुळवेल, भारंगमूळ, कोरांटा, देवदार, नागरमोथे, सुंठ, वृद्ध दारु, रासना, गुग्गुळ, अश्वगंधी, एरंडमूळ, शतावरी ह्यांचा काढा संधिक, सन्निपात, जडता, ग्लानि, भोंवळ, व पक्षघात नाशक आहे.

६ पिंपळमूळ, बेहडा, हरीतकी, बाहव्याचा मगज, आवळकाठी, आडुळसा यांचा काढा येरंडेल घालून द्यावा. तो वायूनें आलेलें मंदत्व दूर करितो.

७ संधिक सन्निपातावर—लंघन, घाम काढणें, पेंड बांधणें, हीं हितावह आहेत. व या उपायानें गात्रें हलकीं होतात. कणेरी वगैरे लघुपथ्य द्यावें.

## २ अंतक सन्निपात.

**लक्षण**—दाह, संताप, मोह, शिर, कंप, उचकी व खोकला, हीं अंतक सन्निपाताचीं लक्षणें होत. हा असाध्यपैकीं आहे.

१ नाचण्याचेंपीठ लसणीच्या रसांत मळून त्याची भाकरी तेल किंवा तूप लावून भाजून गरम अशी मस्तकावर बांधावी. २ प्रहरा नंतर पुनः बांधावी. यानें अंतक सन्निपातव्यथा दूर होते. माझ्या मतें ती भाकर येरंडेलांत भाजावी. वैद्यांनीं बहुत अनुभव घेऊन हा विधि सांगितला आहे.

२ हिरडा, अडुळसा, फालसा, देवदार, कुटकी, रासना, गुळवेल, आणि कोष्टकोळिंजन, ह्यांचा काढा उपद्रवासहित अंतक सन्निपात ज्वरापासून मुक्त करितो यांत संशय नाहीं.

३ आनंदभैरवमात्रा, किंवा शंकरोक्त मृतसंजीवनीरस ( मात्रा ) द्यावा.

## ३ रुग्दाह सन्निपात.

**लक्षण**—तृषायुक्त, अतिशय ज्वर, अति संतापानें शरीर ग्लानि, मस्तकास कंप, तेणें करून कंठ, मान, हनुवटी, ह्यांस व्यथा; श्वास, कास आणि उचकी, या लक्षणांनीं व्याप्त असा हा रुग्दाह सन्निपात कष्टसाध्य व मारकही आहे.

### रुग्दाह सन्निपातावर उपाय.

१ नागरमोथे, रक्तचंदन, सुंठ, वाळा, काळावाळा पित्त पापडा यांचा काढा थंड झाल्यावर द्यावा. तो रुग्दाह सन्निपातास शमवितो.

२ हरीतकी, नागरमोथे, पित्तपापडा, कुटकी, बाहव्याच्या शेंगेतील मगज, काळीं द्राक्षें ( मनुका ) यांचा काढा द्यावा. तो रुग्दाह सन्निपाताचा नाश करितो.

३ ब्राह्मी, मनुका, नागरमोथे, वाळा, बाहवा, कुटकी, वेखंड, त्रिफळा. चिकणामूळ, कडूनिंब, कडूदोडका, दशमूळें, काडेचिराईत यांचा काढा दिला असतां सकल वातव्याधि, आणि रुग्दाह सन्निपात नाशतो.

४ कृष्णागरु, कापूर, सालई, नखला, तगर, वाळा, चंदन व राळ यांचा धूप रुग्दाह सन्निपात्यांच्या खोलींत जाळावा. हितकारक आहे.

५ धने व तांदूळ रात्रीं भिजत घालून प्रातःकाळीं त्याची पेज करून निवळून द्यावी. ती अंतर्दाह आणि पित्तज्वर शमविते.

६ लेप–रुग्दाह सन्निपातावर–बोरीचा पाला, चंदन, कडूनिंबाचा पाला, हीं एकत्र बारीक वाटून

पायाच्या तळव्यास लेप केला असतां रुग्दाह शमतो.

७ दाह, वांति यानीं पीडित, अन्न जात नाहीं, तान्हेनें व्याकूळ, अशा रोग्याला शाळीच्या लाह्याचें पीठ साखर व मध घालून द्यावें.

### ४ चित्तविभ्रम सन्निपात.

**लक्षण**—कोणत्याही प्रकारानें शरीरास वेदना, भ्रम, उन्माद, संताप, मोह, विकलपणा, नेत्राला व्याकुळता, हंसणे, गाणें, नाचणें, व बडबड करणें, हीं लक्षणें झाल्यास याला चित्त विभ्रम सन्निपात म्हणतात. हा असाध्य आहे.

### चित्तविभ्रम सन्निपातावर उपाय.

१ मनुका, देवदार, कुटकी, नागरमोथे, आवळ काठी, गुळवेल, हरीतकी, बाहव्याच्या शेंगेंतला मगज,, काडेचिराईत, पित्तपापडा, कडूपडवळ यांचा अथवा ब्राह्मी, मनुका, कडूपडवळ, वाळा हरीतकी, पित्तपापडा, बाहव्याचा मगज, कुटकी, शंखपुष्पी, यांचा काढा चित्तविभ्रम सन्निपात शमवितो.

२ मोहाची साल, नखला, सावरी, पिंपळी, अर्जुन वृक्षाची साल, हरीतकी, एकांगीमुरा, रक्त-चंदन, यांचा काढा चित्तविभ्रमाचा नाश करितो.

३ ब्राह्मी, वेखंड, शतावरी, त्रिफळा, बाहवा, किराईत, कडूनिंब, कडूपडवळ, द्राक्षें, ( मनुका ) आणि दशमूळें, यांचा काढा चित्तविभ्रम, व रुग्दाह शमवितो.

४ हिरडा, पित्तपापडा, काळीद्राक्षें, शंख-पुष्पी, कुटकी, नागरमोथे, देवदार, बाहव्याचा मगज, ब्राह्मी यांचा काढा चित्तविभ्रम सन्निपाताचा नाशक आहे.

५ अगस्त्याच्या पाल्याच्या रसांत सुंठ गूळ उगाळून, नस्य द्यावें. तें चित्तविभ्रम नाशक आहे.

### ५ शीतांग सन्निपात.

**लक्षण**—शरीर अत्यंत गार, कंप, श्वास, उचकी अंगाला शिथिलता, शद्ब ओढलेला, अंतर्दाह, अल्पायासानें श्रम, संताप, खोकला, वांति आणि अतिसार, ह्यानीं युक्त सन्निपाताच्या ज्वरास शीतांग सन्निपात म्हणतात.

### शीतांग सन्निपातावर उपाय.

१ अर्कादि काढा—रुइचें मूळ, जिरें, त्रिकटु, भारंगमूळ, रिंगणीमूळ, काकडशिंगी, पुष्करमूळ, यांचा काढा गोमूत्रांत सिद्ध करून दिला असतां तत्काळ शीतगात्र सन्निपात, मोह, श्वास, आणि कफ वृद्धि यांचा नाश होतो.

२ महाळुंग, किराईत, पिंपळमूळ, देवदार, दशमूळें, अजमोदा व सुंठ, यांचा काढा शीतांग सन्निपाताचा नाशक आहे.

३ करटोळीचा वाळला कांदा, कुळथ्या भाजून, पित्तपापडा, पिंपळी, वेखंड, कायफळ, शाजिरें, काडेचिराईत, चित्रक, कडूभोंपळा, हिरडा यांचें वस्त्रगाळ चूर्ण अंगास चोळले असतां शीतगात्र सन्निपातांत ज्वर घाम येऊन कमी होतो.

### ६ तंद्रिक सन्निपात ज्वर.

**लक्षण**—झांपड, जिभेवर कांटा फार येणें, शूळ, ज्वर, कफ, तहान यांनीं पीडीत होणें, जीभ काळी, कटीण, अतिसार, श्वास, ग्लानि, तलखी, कर्णशूळ, सारावेळ झोंप, घसा जड, तीव्र ताप, हीं लक्षणें होतात. हा तंद्रिक ज्वर येतांच कमी दिसूं लागते. ( दृष्टी मंद होते. )

### तंद्रिक सन्निपातावर उपाय.

१ सैंधव, कापूर, मनशीळ, पिंपळी, हीं घोड्या-च्या लाळेंत व मधांत खलून, अंजन करावें.

२ भारंगमूळ, गुळवेल, नागरमोथे, रिंगणीमूळ, हरीतकी, पुष्करमूळ, सुंठ, ह्यांचा काढा निकाढा द्यावा दि० ३।७

३ सुंठ, मिरें, पिंपळी, ह्यांचे वस्त्रगाळ चूर्ण करून नाकांत फुंकावें, रोगी सावध होतो.

४ गुळवेल, कडूपडवळ, अडुळसा, सुंठ, मिरें, पिंपळी, ह्यांचा काढा द्यावा.

५ रासनाच्या काढ्यांत मनशीळ, व तिळाचें तेल घालून कढवून तेल शिल्लक राहिले म्हणजे, त्याचे अंजन करावे. हें तंद्रिक सन्निपात नाशक आहे.

६ कोष्ट, कंवडल, सुंठ, हळद, दारुहळद, मिरीं, पिंपळी, वेखंड, हीं बकऱ्याच्या मुतांत वाटून त्याचे नस्य द्यावें, म्हणजे तंद्रिक सन्निपाताला दूर करिते.

## ७ कंठकुब्ज सन्निपातज्वर

**लक्षण**—हनुस्तंभ, दाह, अरुचि, श्वास, कंप, कपाळ दुखणें, बेसावध, मोठा ज्वर, रक्त संबंधी पीडा, कंठाचा अवरोध, बडबड, संताप, हीं लक्षणें होतात.

### कंठकुब्ज सन्निपातावर उपाय.

१ अघाड्याच्या पाल्याच्या रसांत पिंपळी उगाळून नस्य करावें. ( नाकांत घालावें )

२ त्रिफळा, कुटकी, नागरमोथे, त्रिकटु, कुड्याची साल, अडुळसा व हळद ह्यांचा काढा द्यावा. हा फार उत्तम आहे.

३ काकडशिंगी, कुडा, हरीतकी, नागरमोथे, कचोरा, किराईत, भारंगमूळ, हळद, कुटकी, पुष्करमूळ, चित्रक, मिरी, रिंगणीमूळ, अडुळसा, आवळकाठी, देवदार, बेहडे, चवक, सुंठ, पिंपळी, कायफळ, यांचा काढा मंदोष्ण असा द्यावा.

४ त्रिकटु, इंद्रजव, कुटकी, त्रिफळा, दारुहळद, हळद यांचा काढा द्यावा.

## ८ कर्णकसन्निपातज्वर.

**लक्षण**--बडबड, मोह, गळा धरणें, बहिरेपणा, अंगांत तिडका, लाळ गळणें, ज्वर, संताप, कान व गाल, ह्यांस पीडा, किंवा कानाच्या मूळास गांठ उठणें, हीं लक्षणें होतात.

### कर्णकसन्निपातावर उपाय.

१ रासना, रिंगणीमूळ, हिरडे, त्रिकटु, कुटकी, नागरमोथे, पुष्करमूळ, काकडशिंगी, आवळकाठी, भारंगमूळ, यांचा काढा द्यावा.

२ सन्निपातविध्वंसनरस द्यावा. ( नामांकित वैद्याकडे मिळतो )

३ मिरें, दशमूळें, पिंपळी, त्रिफळा, हळद, सुंठ, कुटकी, काडेचिराईत, ह्यांचा काढा सैंधव घालून घेतला तर तो कर्णकसन्निपात दूर करितो.

४ भारंगमूळ, लघुशमी, पुष्करमूळ, रिंगणीमूळ, त्रिकटु, वेखंड, गोडा सुरण, काकडशिंगी, कुटकी, रासना यांचा काढा कर्णकसन्निपाताचा नाशक आहे.

५ गांठ कानाच्या मूळास उठल्यास कर्णमूळावर उपाय सांगितले आहेत ते करावे.

## ९ भुग्नेत्र सन्निपातज्वर.

**लक्षण**--बलक्षय, स्मृतिनाश, श्वास, बडबड, मोह, सततज्वर, वक्रदृष्टि, भ्रम, कंप, सूज, खोकला, डोळे ताठणें, व डोळे थिजणें, हीं लक्षणें होतात. यानें रोगी ८ दिवसांत किंवा तत्काळ मरतो. हा फार जबरदस्त सन्निपात आहे.

### भुग्नेत्र सन्निपातावर उपाय

१ आस्कंद, मीठ, वेखंड, पिंपळी, मिरे, जेष्ट-मध, डाळिंबफळाची साल, लसूण, सुंठ यांचे चूर्ण करून बोकडाच्या मुतांतून नस्य द्यावें.

२ किराईत, मध, वेखंड, पिंपळी, मिरे, लसूण, मोहऱ्या यांचा अवलेह चाटवावा. व मीठ व पिंपळी पाण्यांत उगाळून अंजन करावें. आणि वेखंड मिरे, हिंग, जेष्टमध, डाळिंब यांचें नस्य करावें.

३ दारूहळद, कडूपडवळ, नागरमोथे, रिंगणी, कुटकी, हळद, कडूनिंब, हिरडा, बेहडा, आवळकाठी, ह्यांचा काढा ज्वर व भुग्नेत्र सन्निपातास द्यावा

४ पिंपळी, कडूपडवळ, नागरमोथे, कुटकी,

कडूनिंब, देवदार, रिंगणीमूळ यांचा काढा मोह, पित्त व सन्निपात ह्यांचा नाश करितो.

## १० रक्तष्ठीवी सन्निपातज्वर.

**लक्षण**--रक्त ओकणें किंवा रक्ताच्या गुळण्या येणें, ज्वर, तृषा, वांति, मूर्छा, शूळ, अतिसार, उचकी, पोट फुगणें, डोक्यांत फिरल्यासारखें होणें, तलखी, श्वास, संज्ञानाश, जीभ काळी किंवा तांबडी, व तिच्यावर चट्टे असणें, हीं लक्षणें होतात. हा सन्निपात प्राण नाश करणारा प्रसिद्ध आहे.

### रक्तष्ठीवी सन्निपातावर उपाय.

१ डाळिंबाच्या सालीच्या किंवा फुलाचे किंवा आंब्याच्या झाडाच्या सालीच्या किंवा कांद्याच्या रसाचे ४ थेंब नाकांत घालावे. नाकांतून येणारें रक्त बंद होतें. दूर्वांचा रसही घालावा. व थोडा पिण्यासही द्यावा. कांदा ठेंचून मस्तकावर बांधावा. अथवा बर्फ ठेवावें.

२ पित्तपापडा, कुटकी, धमासा, अडुळसा, किराईत, वाळा, कापूरकाचरी ह्यांचा काढा साखर घालून द्यावा.

३ नागरमोथे, पद्मकाष्ट, पित्तपापडा, चंदन, जाई, शतावरी, जेष्टमध, कडूनिंब, वाळा, चित्रक, रक्तचंदन, ह्यांचा काढा मुखांतील रक्त बंद करितो.

४ सुगंध तृण, ( गांजणीचें गवत ) धमासा, अडुळसा, पित्तपापडा, सांवे ( धान्य ) व कुटकी ह्यांचा काढा रक्तष्ठीवी नाशक आहे

५ मोहाची साल, जेष्टमध, फालसा, रक्तचंदन, पद्मकाष्ट, देवदार, सालवणीची फळें, यांचा काढा थंड करून साखर घालून द्यावा. उत्तम आहे.

६ तोंडांतून रक्त पडूं लागल्यास--पद्मकाष्ट, पांढरा चंदन, पित्तपापडा, नागरमोथे, जाईचापाला, त्रिफळा, रक्तचंदन, वाळा, जेष्टमध व कडूनिंब ह्यांचा काढा दिल्यानें मुखावाटें रक्त पडणें बंद होतें.

७ रक्तष्ठीवी सन्निपातांत अथवा कोण्यांत जीर्णक्षत असल्यामुळें रक्त पडूं लागल्यास अथवा दुसऱ्या कांहीं कारणानें रक्त पडूं लागल्यास तें बंद करण्यास टरपेल हें एक वस्ताद औषध आहे. अशा प्रसंगीं टरपेल अगदीं अल्प प्रमाणांत म्हणजे ५ पासून १० थेंबपर्यंत वरचेवर दुधांतून किंवा ताकांतून किंवा पाण्यांतून द्यावें. दर खेपेस दूध, ताक किंवा पाणी २।३ तोळेपर्यंत द्यावें.

## ११ प्रलापक सन्निपातज्वर

**लक्षण**- कंप, बडबड, संताप, कपाळ दुखणें, प्रौढ गोष्टी सांगणें, स्वच्छपणा असावा असें वाटणें, निचेष्टित होणें, अतिज्वर, दाह, बुद्धिनाश, क्षणांत पुष्कळ बडबड, क्षणांत स्तब्धता, हीं लक्षणें होतात. ह्यांतून जगणेची आशा करणें व्यर्थ.

### प्रलापक सन्निपातावर उपाय.

१ तगर, आसकंद, कुंभा, शंखाहुली, देवदार, कुटकी, ब्राह्मी, जटामांशी, नागरमोथे, आहवा, हिरडा, मनुका, दशमूळें, वाळा, सुंठ, चंदन, अडुळसा ह्यांचा काढा प्रलापक सन्निपात लवकर घालवितो.

२ नागरमोथे, वाळा, दशमुळें, सुंठ, पित्तपापडा, रक्तचंदन, धावड्याची साल, अडुळसा समभाग औषधांचा काढा द्यावा. प्रलापक सन्निपात जातो.

३ शुद्ध पारा, मनशीळ. बचनाग, हिंगुळ, कांत भस्म, ताम्रभस्म, हरताळ, माक्षिक १।१ भाग, गंधक २ भाग हीं एकत्र करून त्यास आम्लवेतस, लिंबू, चुका, आलें, निर्गुंडी या प्रत्येकाच्या रसांत १।१ दिवस खलून नंतर मुंडीच्या रसांत २ दिवस खलावें. मग परळांत घालून वर दुसरा परळ झांकून मातकापड करून भूधरयंत्रांत ४ प्रहर पचन करावें. स्वांगशीत झाल्यावर काढून चित्रकाच्या काढ्यांत २ प्रहर खलून तयार करावा. याला मृतोत्थापनरस म्हणतात. हा १ मासाभर घेऊन हिंग, सुंठ, मिरे, पिंपळी, कापूर यांच्या चूर्णांतून द्यावा.

म्हणजे सन्निपातानें मृतप्राय झाला असला तरी त्यास तत्क्षणीं सावध करितो. यावर पथ्य गाईचें दूध भात.

### १२ जिव्हक सन्निपातज्वर.

लक्षण—कठिण आणि कांट्यांनीं युक्त जीभ, कानास ऐकू न येणें, वाचा नसणें, ज्वर, दाह, खोकला, मोह, श्वास, संताप, यांनीं पीडलेला, बलहीन, हा कठीण आहे.

### जिव्हक सन्निपातावर उपाय.

१ बचनाग, सुंठ, पिंपळी, गजपिंपळी, रुईचें-मूळ, लाल एरंडमूळ, हीं क्रमानें एकापेक्षां एक अधिक घेऊन आल्याच्या रसांत खलून वाल प्रमाण गोळया कराव्या. एक एक गोळी मध तुपांतून द्यावी. जिव्हकाचा नाश होतो.

२ वेखंड, रिंगणीमूळ, धमासा, रासना, गरुड-वेल ( गुळवेल ) सुंठ, काकडशिंगी, कुटकी, पुष्करमूळ, ब्राह्मी, भारंगमूळ, किराईत, अडुळसा, कचोरा यांचा काढा जिव्हक सन्निपाताचा नाश करितो.

३ देवदार, कडूनिंब, हिरडा, बेहडा, कडूपडवळ हळद, दारुहळद, सुंठ, रिंगणीमूळ, पुष्करमूळ, नागरमोथा, गुळवेल, अडुळसा, ह्यांचा काढा कष्ट-साध्य अशा जिव्हक सन्निपाताचा नाश करितो.

४ किराईत अक्कलखार, कोळिंजन, कचोरा, पिंपळी, यांचे चूर्ण सिरसाचें तेल व महाळुंगाचा रस एकत्र गोळी करून मुखांत धरावी म्हणजे जिव्हकाचा दोष जातो.

५ कमळकंद, पिटवण, कोष्ट, शंखपुष्पी यांचे चूर्ण मधांतून चाटवावें. वाणी शुद्ध करितें.

### १३ अभिन्यास सन्निपातज्वर.

लक्षण—यांत सन्निपाताची सर्व लक्षणें पूर्ण असतात व दाह, मोह हीं असतात. तिन्ही दोषाच्या विकोपानें तोंडावर तुळतुळीतपणा असतो. झोंप, अंगगळणें, निचेष्टपणा, कष्टानें शब्दोच्चार, होणें बलनाश, दम कोंडणें हीं लक्षणें होतात हा केवळ मृत्यूच आहे. याला फार त्वरित उपाय करावा. जोपर्यंत श्वासोछ्वास सोडतो आहे; व घशांत औषध उतरत आहे, तोपर्यंत औषधाविषयीं उपेक्षा करूं नये. कां तर दैवगति विचित्र आहे कदाचित् अशांतूनही वाचूं शकेल. यांत क्षीणता फार असते म्हणून हेतोजस सन्निपात म्हणतात.

### अभिन्यास सन्निपातावर उपाय.

१ रिंगणीमूळ, डोरलीमूळ, गुळवेल मनुका, जिरे, त्रिकटु, काकडशिंगी, वावडिंग यांचा काढा करून त्यांत तांदूळ तुपांत भाजून त्याची पेज करावी. आणि ती ऊनऊन अशी ज्वरिताला द्यावी. यानें उचकी, श्वास, कास, वायु, मलमूत्रावरोध, अभिन्यास सन्निपात यांचा नाश होतो.

२ त्रायमाण, दशमूळें, पोखरमूळ, एरंडमूळ ओवा भारंग मूळ, गुळवेल, अडुळसा, कचोरा, काकडशिंगी, त्रिकटु, पांढरी वसुमूळ यांचा काढा गोमूत्रांतून करून किंचित ऊन आहे तोंपर्यंत द्यावा. म्हणजे अभिन्यास सन्निपात जातो.

३ तिलवण, येरंडमूळ, पुष्करमूळ, त्रायमाण, सुंठ, गुळवेल, दशमूळें, कचोरा, काकडशिंगी, अडुळशाची पानें, भारंगमूळ, पांढऱ्या वसूचेंमूळ यांचा काढा गोमूत्रांतून करून दिल्यानें नाडीचें शोधन करून अभिन्यास सन्निपात दूर करितो.

४ हिंग व सुंठ हीं औषधें माका व लिंबू रसांत खलून चाटण द्यावें.

### वरील तेरा प्रकाराहून निराळा १४ हा रिद्रक सन्निपात.

लक्षण—शरीर, नखें, नेत्र, हातपाय हे हळदी प्रमाणें पिंवळे होतात, ज्वर, कफ, खोकला हीं लक्षणें ज्या सन्निपातामध्यें होतात तो हा रिद्रक सन्निपात होय. हा तेरा सन्निपाताहून निराळा असा काळरूप आहे. हा वैद्यास साध्य होत नाहीं.

१ महामृत्युंजय किंवा कालकूट मात्रा आलें खडीसाखरेंतून द्यावी.

सन्निपातावर पथ्य--चतुर्थांश कढवून तयार केलेलें निवालेलें पाणी, पिण्यास द्यावें. जुन्या तांदळाची कणेरी, सैंधव घालून द्यावी. पित्ताधिक्य असल्यास खडीसाखर घालून द्यावी. तुरी, मूग, कुळीथ, या पैकीं यूष साळीच्या लाह्याचें पाणी, १६ पट पाणी घालून चवथा हिस्सा उरेपर्यंत कढवून केलेली कणेरी पथ्यास द्यावी.

अपथ्य--थंडपाणी, मद्य, मांस, वारा, कापसाची गादी, जडान्नभक्षण, रोग्याशीं फार भाषण, मोठा आवाज किंवा गलबा वगैरे वर्ज.

### १५ समत्रिदोष लक्षण.

वात, पित्त, कफ हे एकदांच सम बलानें कुपित होऊन त्यांचीं पूर्वोक्त लक्षणें संपूर्ण होतात आणि सर्व इंद्रियांचे व्यापार थांबतात. कांहीं खाववत नाहीं, अतिश्वास, अंग ताठणें, डोळे थिजणें, हीं लक्षणें होतात. ह्या लक्षणांनीं युक्त रोगी तीन चार दिवसांत मरतो.

जो दोष वाढला असेल त्याला कमी करावा. व कमी असेल त्याला योग्य अवस्थेपर्यंत वाढवावा म्हणजे वैद्यांनीं आपल्या आवाक्यांत ठेवावा. वाढलेल्या दोषाला शमविलें म्हणजे मध्यम दोष आपल्या आपण शांत होतो.

---

## २७ आगंतुकज्वर.

आगंतुकज्वर १५ प्रकारचे आहेत.

**कारणें**—हे ज्वर अतिक्रोध, शोक, भय, चिंता, अतिलाभ, अतिहानि, संताप, श्रम, आघात, शस्त्रघात, भूतबाधा, शूळ, वेदना करणारे रोग, ( गळवें, नारू, गुडघी, इ. ) इत्यादि कारणांनीं येतात. वैद्यांनीं त्या त्या कारणाचा चांगला विचार करून औषधी योजना करावी. त्या शिवाय देवी, गोंवर, कांजिण्या वगैरे येण्याच्या पूर्वी ३ दिवस लहान मुलांस किंवा मोठ्या माणसासही मोठा ज्वर येतो. परंतु हा ज्वर त्या त्या रोगाचा प्रतिकार झाला म्हणजे आपोआप जातो. बहुधा निराळ्या औषधाचें कारण पडत नाहीं. असल्या ज्वरास लंघन नियम लागू नये म्हणजे लंघन करवूं नये. याशिवाय सांथीच्या तापाचीं लक्षणें व उपाय पुढें दिलें आहेत.

### १ अभिचारज्वर.

**लक्षण**--तृषा, मोह, अंगावरफोड, भ्रम, मूर्छा, चित्ताचा संताप, दाह, उत्तरोत्तर रोगाची वृद्धि, हीं लक्षणें होतात हा ज्वर होम, मंत्र, तंत्र, यांच्या विपरीत कारणांनीं मनास धक्का येतो.

**उपाय**--या वर मनाची शांति होणेसारखे उपाय करावे ते असे होम, देवपूजा, व्रतें, तीर्थयात्रा, देवास प्रदक्षिणा, वगैरे भाविक उपायांनीं जिंकावा.

### २ शापज्वर.

**लक्षण**—ब्राह्मण, गुरु, वृद्ध, सिद्ध महासाधु यांच्या शापापासून किंवा अनिष्ट वचनापासून मनास धक्का बसून हा ज्वर येतो. ह्यांची लक्षणें अभिचार ज्वराप्रमाणेंच तृषा मोहादिक होतात.

**उपाय**—ज्या व्यक्तिपासून अनिष्ट वचनकारक शाप झाला असेल, त्यास शरण जावें. अथवा जप, होम, दान, व्रतें वगैरे मनःशांतिचे उपाय करावे.

### ३ भीतिज्वर.

**लक्षण**—भयंकर शब्दानें किंवा आवाजानें, अथवा मोठी तोहमत अंगावर आल्यानें, किंवा येण्याच्या भयानें मनास धक्का बसून हा ज्वर येतो. यांत बडबड, मस्तकपीडा, कंप, अंधेरांत लपून बसावेंसें वाटणें, तोंड झांकून घेणें हीं लक्षणें होतात.

**उपाय**—भयनाशक उपाय करावे धीर द्यावा, समाधानाच्या गोष्टी सांगाव्या, आनंद उत्पन्न होण्यासारख्या वार्ता सांगाव्या.

## ४ भूतावेशज्वर.

**लक्षण**—हा ज्वर पिशाच्चादिकांच्या संबंधानें उत्पन्न होतो. चित्तास उद्विग्नता, हसणें, रडणें, कांपणें हीं लक्षणें होतात. शिवाय लज्जा, बुद्धि, निद्रा यांचा नाश होतो.

**उपाय**—१ पंचाक्षरी, देवऋषी यांजकडून उपचार करवावे.

२ शनिवारी आवंतून रविवारी चिकणामूळ आणून ( शुचिर्भूतपणें आणावें ) धूप देऊन गळ्यांत बांधावे.

३ वरील प्रमाणें सूर्य फुलाचें मूळ आणून कानास बांधावें.

४ खेंकड्याच्या बिळांतील मातीचा तिलक करावा. म्हणजे भूतज्वर जातो.

५ भूतविद्येमध्यें सांगितलेले गाढणें, मंत्र, तंत्र वगैरे उपायांनीं हा ज्वर जिंकावा.

६ भूत प्रेतादि ज्वरास अंजन——लसूण, मिरे, सर्पाच्या कातीचे भस्म, कायफळ, हिंग, रिठा, वेखंड, शेवग्याची साल, हिंगणभिळ्याचें मेण, कडूनिंबाच्या बिया, सर्व समान घेऊन गाढवाच्या मुतांत खलून गोळया कराव्या. याच्या अंजनानें सर्व भूत प्रेतादि दोष जातात.

## ५ कामज्वर.

**लक्षण**—तरुणाच्या शरीरामध्यें काम संचार होऊन वेळेवर स्त्रियोपभोग मिळाला नाहीं तर हा ज्वर उत्पन्न होतो. यांत स्त्रीविषयक चिंता, शरीरदाह, मन अस्थीर, गात्रें शुष्क होणें, आळस, अन्नावर इच्छा नसणें, थंड पदार्थांची इच्छा, बुद्धि, मोह, लज्जा यांचा क्षय. आणि विरह वेदना हीं लक्षणें होतात.

**उपाय**——१ चंदन, कापूर, वाळा यांची उटी लावावी, म्हणजे दाह शांत होतो.

२ कमळाच्या पानावर निजवावें. तळ्यावर वगैरे गार हवेंत न्यावें, व त्याजबरोबर थट्टामस्करीची भाषणें करावीं, व पंख्यानीं वारा घालावा.

३ सुरूप व चतुर स्त्रीचें आलिंगन करवावें

४ रात्रीं धनें पाण्यांत भिजत घालून सकाळीं हातानें कुस्करून पाणी गाळून खडीसाखर घालून पाजावें.

## ६ शोकज्वर.

हा शोकापासून उत्पन्न होतो. लक्षणें भीति ज्वराप्रमाणें जाणावी.

**उपाय**——शोक न होण्यासारख्या सांत्वनाच्या गोष्टी सांगाव्या. २ आनंदाच्या वार्ता सांगाव्या. कांहीं तरी उपायानें शोकाचा विसर पाडावा.

## ७ क्रोधज्वर ( संतापज्वर )

**लक्षण**——हा अति क्रोधापासून उत्पन्न होतो. कंप, डोकें दुखणें, दाह, बडबड, डोळे वटारलेले, व लाल होतात.

१ पित्तनाशक उपाय करावे. आश्वासन, इष्ट विषयक प्राप्ती, आणि क्रोधाच्या कारणाचा नाशक उपाय करावा.

## ८ विषज्वर.

**लक्षणें**——कोणी विष घातल्यानें किंवा नकळत विष पोटांत गेल्यानें हा ज्वर उत्पन्न होतो. कंप, चेहरा बदल होणें, शरीर पिंवळट, हिरवट होणें, अथवा हिरवट पिंवळे होणें, ग्लानि हीं लक्षणें होतात. दाह, अरुचि, अतिसार, तृषा, पोटांत आग, चैन न पडणें, हीं विशेष लक्षणें असतात.

**विषज्वरावर उपाय**——१ विष रोगांत सांगितलेले उपाय करावे. २ जुलाब वांति द्यावी. ३ पोटांत गेलेल्या वीषाइतका टाकणखार पाण्यातून किंवा मधातून द्यावा.

## ९ तीव्रौषधि गंधजन्यज्वर.

**लक्षण**—हा ज्वर, एकाद्या उग्र औषधाच्या किंवा पदार्थाच्या वासाने येतो. मूर्छा, वांति, कपाळ दुखणें, मळमळ, शिंका, कंप, हीं लक्षणें होतात.

१ पित्तशामक, शीतळ व सुगंधिक उपाय करावे सुंगधी अत्तरें, फुलें हुंगावी.

## १० श्रमजन्यज्वर.

**लक्षण**—अतिश्रम, अति मार्ग चालणें, ओझें उचलणें, इच्छित कार्य करण्याविषयीं अति खटपट करून, तें न साधल्यामुळें वाटणाऱ्या श्रमापासून ज्वर येतो. या ज्वरांत अंग दुखणें, सांधे दुखणें, डोळ्यावर झांपड हीं लक्षणें होतात.

१ पुष्कळ विसावा घ्यावा म्हणजे श्रमज्वर जातो. स्वस्थ निजून रहावें.

२ मद्य, अफू, भांग वगैरे मादक पदार्थ योग्य प्रमाणानें सेवन करावें.

३ शारीरश्रमास तेल लावून अंग रगडावें. म्हणजे श्रमज्वर जातो.

४ तूप पाजावें. मांसरस द्यावा, पेढे, जिलबी, बदामाचे लाडू वगैरे पौष्टिक पदार्थ खावे. आणि यथेच्छ निद्रा घ्यावी. म्हणजे श्रमज्वर जातो.

५ सर्वांग तेल लावून रगडून पुष्कळ ऊन पाण्यानें स्नान करून जाड पांघरूण घेऊन स्वस्थ निजावें. घाम येऊन श्रमज्वर जातो.

६ तूप, दूध, साखर मिसळून पाजावें.

## ११ दाहज्वर.

**लक्षण**—शेकण्यानें किंवा अंग भाजल्यानें हा ज्वर उत्पन्न होतो. तृषा, भ्रम, मूर्छा, चित्ताचा संताप, अंगावर फोड येणें, शरीराचा दाहा, ज्वराची वृद्धि, हीं लक्षणें होतात.

**उपाय**--१ शीतोपचार करावे, मधुरान्न खावें, तूप, दूध प्यावें. पित्तशामक उपाय करावे.

२ पित्तज्वरावरील औषधें द्यावीं. ३ अश्वगंधी व उंबराचा चीक साखर मिसळून द्यावा. ४ धने ४ तोळे कुटून ६ पट पाण्यांत रात्रीं भिजत घालून सकाळीं गाळून साखर मिसळून द्यावें. दाहा, ताहान जाऊन मूत्र साफ होते. ५ धने, आवळकाठी, अडुळशाचीं पानें, मनुका, पित्तपापडा, समान घेऊन कुटून रात्रीं भिजत घालून सकाळीं गाळून द्यावें. रक्त पित्तज्वर, दाह, तृषा शांत होते.

## १२ क्षतजन्यज्वर.

**लक्षण**--कांहीं कारणांनीं अंगास क्षतें पडून किंवा दुखापत होऊन त्या त्रासानें हा ज्वर उत्पन्न होतो. अंग ठणकणें, अरुचि, निद्रा न येणें, सूज हीं लक्षणें होतात.

**उपाय**--१ तुरट व मधुर हे उपचार करावे. क्षतावरील उपचार त्या त्या रोगोक्त करावे.

## १३ अभिघात (छेदन) जन्यज्वर.

**लक्षण**--शस्त्रादिकांच्या छेदनानें किंवा, दंड ताडणानें, किंवा उंचीवरून पडण्यानें, आपटण्यानें, अथवा वर्मी लागल्यामुळें हा ज्वर येतो. यांत अरुचि, निद्रा न येणें, सूज, संताप, ठणका हीं लक्षणें होतात.

१ घृतपान करवावे. मोहनभोग किंवा तूप पुष्कळ घालून सांजा खावा. मद्य व मांसरस द्यावें. बाकी उपाय त्या त्या प्रकरणांतले करावे.

## १४ स्वेदजन्यज्वर.

**लक्षण**--फार श्रम करणें, चढणीवर चढणें, धावणें, मोठा घाम येण्यासारखा व्यायाम वगैरे कृत्य करणें, बलवंताशीं झोंबी करणें, साहस कर्म करणें, घोड्यावर बसून खूप पिटाळणें, यांनीं अतिश्रम, होऊन घाम पुष्कळ येऊन स्वेदज्वर उत्पन्न होतो. यांत अंग जखडल्यासारखें होणें, अतिमोह, मूर्छा, ग्लानि, श्वास, स्तब्धता, नेत्र मिटणें, कंप, हळू बोलणें, डोळ्यांत पाणी येणें हीं लक्षणें होतात.

१ अंगमर्दन करावें, घामावरील व श्रमावरील उपचार करावें.

२ सुंठ, मिरे, पिंपळी, हिंग, किराईत यांचे चूर्ण मधांत द्यावें.

### १८ दृष्टिज्वर.

लक्षण--पापी मनुष्याच्या देखत जेवल्यानें, अथवा सुंदर मुलास, पापीचांडाळाची दृष्टि लागल्यानें, क्षुधेनें पीडिताच्या समोर जेवल्यानें, अथवा सुंदर भाषण, रूप वगैरे पाहूनही दृष्टि लागते. यांत बुद्धीला विपर्यास, अंगास शिथिलपणा, अन्नाचा कंटाळा, अनेक उत्तम औषधांनींही गुण न येणें.

१ यावर दृष्टि काढावी. अन्नावर दृष्टि लागल्यास मीठ मंत्रून खाऊं घालावें. जो पदार्थ खाऊं नयेसा वाटेल तो पदार्थ कुत्र्यास किंवा चांडाळास खाऊं घालावा. ( तो पदार्थ दृष्टि लागलेल्या मनुष्यावरून उतरून टाकणेची पद्धति आहे. )

---

## २८ कांहीं क्षुद्रज्वर.

### १ ऋतु बदलल्यामुळें येणारा ताप.

या ज्वरांत त्या त्या ऋतुमानास अनुलक्षून लक्षणें होतात.

१ धणे, गुळवेल, धमासा, पित्तपापडा, वाळा, नागरमोथे, कुटकी ह्यांचा काढा करून द्यावा.

२ घाम फार येत असल्यास--राख वस्त्रगाळ करून त्यांत वेखंड, ओवा ह्यांचे चूर्ण मिसळून अंगास चोळावें.

### २ साधी कणकण येऊन ज्वर भरणें.

हा ज्वर इतर प्रमाणें संसर्गानें किंवा भयंकर सांथीनें उत्पन्न झालेला नसतो, पण खाण्यापिण्याच्या व वागण्याच्या फेरफारानें किंवा अव्यवस्थितपणामुळें उत्पन्न झालेला असतो. किंवा ऊन किंवा वारा लागून सरद हवेनें, किंवा थंडीनें, श्रमानें, किंवा इतर क्षुल्लक कारणानेंच आला असतो. हा ज्वर साधारण त्याच्या उलट उपचारानें सहज जातो. जसें थंडी वाऱ्याचा असल्यास ऊनपाणी पिऊन गरम कपडा वापरल्यास व शेक दिल्यास जातो. उष्णतेनें आला असल्यास शीतोपचारानें शमतो. परंतु त्याची उपेक्षा केल्यास तोच मोठ्या प्रमाणांत जाऊन विषमज्वर होऊन बसतो.

लक्षण--साधारण ज्वराचीं सौम्य लक्षणें असतात.

१ गंधक १ तोळा, सैंधव २ तोळे, एकत्र वाटून लिंबू रसांत खलून गोळ्या मोठ्या गजग्या एवढ्या करून १|१ गोळी देणें. दि० ३ पथ्य ऊन पाणी, दूध भात.

२ एकादें क्षारयुक्त सौम्यसारक औषध द्यावें. नंतर घाम येणारें व लघवी साफ होणारें औषध द्यावें.

३ सुंठीचा काढा गूळ घालून द्यावा.

४ नुसत्या पाण्याचा चतुर्थांस काढा करून द्यावा.

### ३ कृमिजन्यज्वर. ( जंतापासून होणारा )

लक्षण--जंतापासून ज्वर असल्यास केव्हां केव्हां हुबेहूब सन्निपाताप्रमाणें लक्षणें होतात. अन्नद्वेष, ओकारी, तहान, मूर्छा, व ढाळ होतात किंवा अवष्टंभ होतो, व बडबडतो.

उपाय--१ प्रथम जंतावरील उपाय करावे. ( कृमि प्रकरण पहा ) मग ज्वराचें रूप पाहून त्या प्रमाणें योजना करावी.

---

## २९ कालज्वर.

लक्षण--अंतर्दाह, बाहेर थंडी, कफ दाटणें, अरुचि, जीभ फार काळी, नाडी सूक्ष्म पण फार तीव्र, डोळे लाल होणें, मूर्छा, बडबड, बुद्धिभ्रम, नानाप्रकारच्या चेष्टा करणें, संताप, मोह, हातआपटणें, पायझाडणें, तोंडावर मारून घेणें, व्याकूल होणें, कंप हीं लक्षणें होतात. हा कष्टसाध्य आहे.

१ नागरमोथे, गुळवेल, पित्तपापडा, मनुका, कुटकी यांचा काढा द्यावा.

२ पिंपळी, देवदार, पुष्करमूळ, सुंठ, वेखंड, रासना, बाळहिरडे, पित्तपापडा, धमासा, भारंगमूळ, मिरे, पिंपळी, त्रायमाण, कचोरा, गुळवेल, रान वांग्याचें मूळ, यांचा काढा द्यावा. म्हणजे तंद्रा, दाह, शोष, कास, श्वास, कालज्वर जातो.

## ३० नवज्वर.

( यालाच नूतन ज्वर किंवा अपक्वज्वर म्हणतात. )

**लक्षण**--लाळेचा स्राव, ओकारी होते असें वाटणें, उरांत जड वाटणें, अरुचि, झांपड, आळस, अन्नाचा पाक न होणें, तोंड बेचव, अंगाला जडपणा, क्षुधा नसणें, वरचेवर मूत्र होणें, अंग ताटणें, पुष्कळ ज्वर असणें हीं अपक्वज्वराचीं लक्षणें जाणावी. अशी लक्षणें असतां औषध देऊं नये. कारण अपक्व दोषांत औषध दिलें तर ज्वर वाढतो. शोधन किंवा शमन औषध दिलें तर विषमज्वरावर जातें. आणि अपक्वज्वर वाढल्यास मृत्यूच येतो यांत संशय नाहीं.

**उपाय**--१ नवज्वर व महाज्वर यांस--जलपिंपळी ( पत्तूर ) सावलींत वाळवून चूर्ण करून मधांतून चाटवावें. दरवेळीं ३ मासे द्यावें. पथ्य, ताकांत सुंठ उगाळून ऊन करून द्यावें. नवज्वरांत दूध देणें हें विष दिल्यासारखेंच आहे.

२ एक शेर माक्याच्या रसांत ५ तोळे सोरमीठ घालून कढवून रस आटल्यावर खडा काढून एक-दोन गुंजाभार घेऊन मधांतून द्यावा. ज्वर तत्काळ उतरतो.

३ निंबूरस माक्याचा, रस दोन्ही मिळून आठ तोळे, मिरे ६ मासे, कमलकोश १२ याचा लेह करून द्यावा.

४ जेव्हां वरील ज्वरांत मळशुद्धी होत नाहीं, ग्लानि येते, मलशुद्धी झाली तर अपक्व होते. यास्तव यावर ७ दिवस लंघन करावें. यानें दोष पक्व होतात, मग औषध द्यावें.

५ कुटकी, नागरमोथे, पिंपळमूळ, व बाळहिरडे यांचा काढा निकाढा निवाल्यावर थोडा मध घालून दिला असतां आमाशयगतज्वराचें शोधन होऊन ज्वर जाईल.

६ शुद्ध पारा १ शुद्ध गंधक २ शुद्ध हिंगूळ ३ शुद्ध जेपाळ ४ भागवार घेऊन दांती मूळाच्या काढ्यांत खलून गुंज प्रमाण गोळ्या करून एक गोळी सकाळीं थंड पाण्याबरोबर द्यावी. रेच होऊन १ दिवसांतच नवज्वर जातो.

७ ज्वर धूमकेतु--शुद्ध (.पारा, गंधक, हिंगूळ ) समुद्रफेण हीं आल्याच्या रसांत १ प्रहर खलावी. २ वालाच्या गोळ्या करून आल्याच्या रसांतून ३ दिवस सकाळ संध्याकाळ १।१ गोळी द्यावी. नूतन ज्वराचा नाश होतो.

८ नवज्वरेभसिंह--शुद्ध ( पारा व गंधक, ) लोह, ताम्र, शिसें, यांचीं भस्में, सुंठ, मिरे, पिंपळी समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करावें. आणि अर्धा भाग बचनाग घालून सर्वांचा आल्याच्या रसांत २ दिवस खल करावा, व २ गुंजा वजनाच्या गोळ्या कराव्या. आल्याच्या रसांतून १ गोळी दिली असतां, उग्र नवज्वर व वात संग्रहणी जाते. इतर ज्वरासही द्यावा.

९ शुद्ध पारा १ भाग, शिलाजीत, पिंपळी, बाळहिरडे, अक्कलकार, सिरसाच्या तेलांत शुद्ध केलेला गंधक, कवंडळ हीं ४।४ भाग घेऊन सर्वांचा कवंडळीच्या ( कडूवृंदावनाच्या ) रसांत खल करून गोळ्या १ मासा प्रमाण करून गुळवेलीच्या रसांतून १ द्यावी. हिला ज्वरघ्नी गुटी म्हणतात.

१० विश्वताप हरण--शुद्ध पारा, ताम्रभस्म, निशोत्तर, गंधक, कुटकी, शुद्ध जेपाळ, पिंपळी, बचनाग, कुचला हरीतकी समभाग घेऊन धोत्र्याच्या रसांत एक दिवस खल करावा. त्याच्या २ वालाच्या गोळ्या करून १ गोळी आल्याच्या रसांतून द्यावी.

म्हणजे नूतन ज्वराचा नाश होतो. यावर पथ्य मूगाचें काटन ( कढण ) व लघु अन्न द्यावें.

११ शुद्ध पारा, गंधक, टांकणखार, मिरे सम-भाग घेऊन मच्छ पित्तांत खल करून ३ दिवस घोटून वाल प्रमाण गोळ्या करून १।१ गोळी आल्याच्या रसांतून द्यावी. यानें क्षणांत घाम येतो, याला पथ्य नाहीं.

## ३१ विषमज्वर.

**लक्षण व कारण**--ज्वरामध्यें अपथ्य केल्यानें किंवा योग्य औषधोपचार न झाल्यानें, किंवा आरंभा-पासून रसरक्तादि धातूंमध्यें दोष उत्पन्न होऊन विषमज्वर उत्पन्न होतो. भालुकी तंत्रांत " शीत किंवा उष्ण यांनीं अनियत काली ज्वर येतो त्याला विषमज्वर म्हणावें " असें सांगितलें आहे. यांत ज्वर निघतो आणि पुन्हा येतो हे त्यांत विशेष आहे.

**विषमज्वराचीं नांवें**—संतत, सतत, अन्येद्युष्क ( द्याहिक ) त्र्याहिक, चातुर्थिक असे ५ प्रकार आहेत.

१ रसधातुगतज्वर असला म्हणजे संतत ज्वराला उत्पन्न करितो.

२ रक्तधातुगतज्वर असला म्हणजे सतत ज्वराला उत्पन्न करितो.

३ मांसधातुगतज्वर असला म्हणजे द्व्याहिक ज्वराला उत्पन्न करितो.

४ मेदोगत दोष असला म्हणजे त्र्याहिक ज्वराला उत्पन्न करितो.

५ मज्जा, अस्थिगत दोष झाला असतां चातु-र्थिक ज्वर उत्पन्न करितो. या विषमज्वरांत वात, पित्त, कफ यांपैकीं जो दोष जास्त असेल त्यावरील चिकित्सा करावी.

विषमज्वराचा जोर कमी करण्याकरितां ऊर्ध्व शोधण्यासाठीं वांति व अधःशोधनासाठीं रेचन द्यावें.

१ विषमज्वराच्या पाचनार्थ भुईतरवड ( सोना-मुखी ) बाळहिरडे, मनुका, जिरे यांचा काढा द्यावा.

२ सुंठ, पिंपळमूळ, बडीशेप, भुईतरवड, बाहव्याचा मगज, बाळहिरडे यांचा काढा सैंधव घालून द्यावा. हा विषमज्वरावर पाचन व रेचन आहे.

३ काळीं द्राक्षें ( मनुका ) त्रिफळा, सुंठ, धणे, यांचा काढा पाचन व द्रावक असा आहे.

४ कोरफडीचेमूळ, १ तोळा घेऊन वाटून ऊन पाण्यांतून पाजावें. म्हणजे वांति होऊन फार दिव-साचा विषमज्वर जातो.

### विषमज्वरावर उपाय.

१ वातादिक विषमज्वरावर--घृतें ( औषधांनीं तयार केलेलीं ) व अनुवासन बस्ति द्यावा.

२ पित्ताधिक विषमास—दूध तापवून त्यांत तूप ( औषधांनीं सिद्ध केलेलें ) घालून रेचन द्यावें. व कडू व शीतोपचार करावा.

३ कफादिक विषम असेल तर—वमन, पाचन व रुक्ष असें अन्न, पान व लंघन व तुरट औषधें द्यावी.

४ कडूपडवळ, कडूनिंब, डोरलीमूळ, इंद्रजव, गुळवेल ह्यांचा काढा मध घालून दिला असतां फार दिवसांचा विषमज्वर जातो.

५ भारंगमूळ, पित्तपापडा, सुंठ, अडुळसा, पिंपळी, किराईत, कडूनिंब, रिंगणीमूळ, गुळवेल, नागरमोथे, धमासा ह्यांचा काढा जीर्णज्वर धातुगत-ज्वर, व अनेक उपद्रवांनीं युक्त असा विषमज्वर व सर्वज्वर, यांचा नाश करितो. हा तीन किंवा ७ दिवस घेतला असतां यमाच्या पाशांतूनही वाचेल.

६ सैंधव, मनशीळ, पिंपळीतील दाणे, तेलांत खलून अंजन करावें.

७ वडाचें पिकलें पान १, पुदीन्या ६ मासे, हरभऱ्याचें फोल ६ मासे, शेळीच्या लेंड्या ३, खुळा ऊस ६ मासे, पित्तपापडा ६ मासे, जोंधळ्याच्या लाह्याचें पीठ ६ मासे, गूळ १ तोळा, ह्यांचा अष्ट-

मांश काढा करून द्यावा. घाम येऊन ज्वर कमी होतो. हा अनुभविक आहे.

८ जोंधळे १ तो. बाजरी १ तो. लवंगा ९ तुळशीचीं पानें ४ पुदीन्याचीं पानें ४ दालचिनी १ मासा ह्यांचा अष्टमांश काढा करून देणें काढा सोसेल तितका ऊन घ्यावा व जाड पांघरुणाचें मुस्कुट घालून निजवावें. घाम येऊन १ प्रहरांत ज्वर जातो.

९ लसणीच्या कुड्या ९ थोड्या दुखवून त्याचा अष्टमांश काढा करून ३।७ दिवस गूळ घालून द्यावा.

१० कुचल्याचें बीं कातरून तुप लावून करपू न देतां भाजून त्याचें बारीक चूर्ण करून आकार व शक्ति पाहून १ किंवा अर्ध गुंजभार विडयांतून द्यावे. घाम येऊन ज्वर जातो.

११ वडाचें पिकलें पान किंवा पानाचीं १० डेखें, मनुका, पानकणीस, साळीच्या लाह्या, शेळीच्या लेंडया, गुळवेल, आपट्याचीं पानें यांचा अष्टमांश काढा करून द्यावा. घाम येऊन ज्वर जातो.

१२ विषम व महाज्वर नाशक काढा—टांकळा, शिवण, बेल, पाडळ, टेंटू यांचीं मूळें, इंद्रजव, कुटकी, नागरमोथे, पत्रजमूळ, चवक, चित्रक, पिंपळी, पिंपळमूळ, सुंठ यांचा काढा करून निवाल्यावर मध घालून द्यावा. यानें घोर विषमज्वर, सन्निपातज्वर, शीतपूर्वकज्वर, परतलेला ज्वर जाईल.

१३ स्वयंभैरवरस—पारा, गंधक, बचनाग हे १।१ भाग, जेपाळ अर्ध भाग, हीं सर्व शुद्ध करून घ्यावीं. पिंपळी सर्वांच्या अर्धा भाग, घेऊन चूर्ण करून सर्व खलून ठेवावें. आणि विड्याच्या पानांतून १ किंवा १॥ गुंजभार शक्ति पाहून द्यावें. ढाळ होऊन विषमज्वर, जीर्णज्वर मंदाग्नि जाईल. उतार तूप भात.

१४ रामबाणरस—पारा १, मनशीळ २, कलखापरी ४ भाग एकत्र करून कारलीच्या रसाच्या ७ भावना द्याव्या. वाल प्रमाण गोळ्या करून साखरेंतून किंवा विड्यांत सकाळ संध्याकाळ १।१ गोळी द्यावी. पथ्य दूध भात. दि० ७, ओकारी झाल्यास साखर घालून दूध पाजावें. विषमज्वर जाईल.

१५ तुळशीच्या रसांत मिरपूड घालून देणें. विषमज्वर जातो. दि० ३

१६ तांदुळज्याच्या मुळया वाटून मस्तकीं बांधाव्या डोकें शांत होतें.

१७ कडूलिंबाचा पाला, वेखंड, कोष्ट, हिरडे, शिरस, तूप व गुग्गुळ, यांचा धूप द्यावा. यांत थोडी राळेची पूड घालावी म्हणजे धूर चांगला येतो.

१८ सर्पाची कात, सिरस, हिंग, कडूनिंबाचीं पानें समभाग घेऊन चूर्ण करून धूप दिल्यानें ज्वर शांत होतो.

१९ विषमज्वर व हिंवतापावर —कडूनिंबाच्या सालीच्या काढ्यांत धणे व सुंठ यांचे चूर्ण घालून द्यावें.

२० विषम सुंदररस शुद्ध पारा, गंधक, कलखापरी, मनशीळ, हरताळ सर्व समभाग शुद्ध घेऊन एकत्र करून कणेरीच्या रसांत १ दिवस खलून नंतर मातीच्या बोळक्यांत भरून वर पणती बसवून मात कापड करून एका मोठ्या खापरांत वाळू भरून त्यांत बोळकें ठेवून काठापर्यंत वाळू भरून वर साळीचा कोंडा घालावा. नंतर चुलीवर ठेऊन १ प्रहर मंदाग्नि द्यावा. साळीचा कोंडा करपल्यावर अग्नि बंद करून स्वांगशीत झाल्यावर काढून कारलीच्या पाल्याच्या रसांत खलून मात्रा वाल प्रमाण करून पिकलेल्या केळ्यांतून अथवा गुळांतून द्यावी. म्हणजे ५ प्रकारचे विषमज्वर, एकयाहिक, द्वयाहिक, त्र्याहिक, चातुर्थिक व दाहपूर्वकज्वर हे निश्चयानें जातील. पथ्य मुगाचें कढन, दूध भात, साखर दि० ३।७

२१ मोरचूद, हरताळ हे शुद्ध घेऊन त्यांत त्या समान शंखभस्म, कवडीभस्म मिळवून कोरफडीच्या रसांत खलून परळांत घालून मात कापड करून कुक्कुटपुट देऊन स्वांगशीत झाल्यावर काढून एक

तोळा साखरेंतून २ गुंजाभार भस्म द्यावें. त्यावर तत्काळ दूध भात खावा. वांति झाल्यास गुळवेलीचा रस किंवा लवंगाचें चूर्ण मधांतून खावें. १।२ दि० घेतल्यास विषमज्वर जातो.

२२ पारा, गंधक, बचनाग शुद्ध व समान घेऊन त्या तिहींच्या समान धोत्र्याचें बीं शुद्ध करून घालावें. या सर्वांच्या दुप्पट सुंठ, मिरें, पिंपळी यांचें चूर्ण घालून लिंबूच्या व आल्याच्या रसांत खलून वाल प्रमाण गोळ्या कराव्या. याला महाज्वरांकुश म्हणतात. हा सर्व ज्वरांचा काळ आहे. यानें एकयाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक, विषम किंवा सन्निपातज्वर यांचा एक दिवसांत नाश होतो. अनुपान, साखर मध किंवा विडयाचें पान यांत द्यावें

२३ विषमज्वरांत ताम्रभस्माची मात्रा चांगली लागू पडते. पण तें भस्म मात्र उत्तम असावें आणि तें अल्प प्रमाणांत द्यावें.

२४ मनशीळ, सोमल, मोरचूद, हे पदार्थ शुद्ध व समान घेऊन पाण्यांत खलून उन्हांत वाळवून खापरांत घालून चुलीवर ठेऊन जाळ लावून ४ घटका लोखंडाच्या पळीनें घोटून धूर निघेनासा झाल्यावर दोन घटका तसेंच घोटून नंतर स्वांगशीत झाल्यावर औषध काढून घ्यावें. तें मोठ्या सशक्त माणसास अर्ध गुंज प्रमाण घेऊन तूप साखरेंतून द्यावें. अशक्तास पावगुंज व लहानास १२ वर्षांच्या आंतील मुलास उडीदभार द्यावें. पथ्य, नुसता दूध भात. ३ च दिवसांत आठ प्रकारचे ज्वर निःशेष जातात. ज्वर ताबडतोब जावा अशी इच्छा असल्यास कुटकीचें चूर्ण १॥ मासा, काडेचिराईताचें चूर्ण पाऊणमासा, हिरडेदळ अर्धामासा एकत्र करून त्यांतून वरील प्रमाणानें औषध देणें.

निघालेला ज्वर पुन्हा आणवून कौतुक दाखवयाचें असल्यास पिंपळीमूळ पाऊणमासा, अक्कलकारा १॥ मासा, याच्या वस्त्रगाळ चूर्णांत वरील मात्रा वरील प्रमाणांत दिल्यास सपाटून ज्वर येतो. अंगाचा फार दाहा झाल्यास शिकेकाईचें पाणी अंगास लावावें. किंवा रिठ्याच्या पाण्याचा फेस अंगास लावावा. म्हणजे दाह शमन होतो. मग ताप घालविण्याकरितां पुन्हा तूप साखरेंतून पूर्वी दिलेल्या प्रमाणानें मात्रा द्यावी. हें रसायन नेहमी गुप्त ठेवावें. याला ज्वर केसरी म्हणतात. यांत सोमल आहे म्हणून भिण्याचें कारण नाहीं. हें रसायन करते वेळीं सोमल उडून जाऊन अखेर मोरचुदातील ताम्र मात्र शिल्लक असतें ही यांतील खुबी आहे. सूज्ञ वैद्यांनीं अनुभव घ्यावा. वरील रसायन करतेवेळीं त्याचा विषारी धूर नाका तोंडांत न जाऊं देण्याविषयीं खबरदारी घ्यावी.

## १ संततज्वर.

**लक्षण**—७।१० किंवा १२ दिवस एकसारखा ज्वर असून घाम येऊनही ज्वर भरतो, तो संततज्वर जाणावा. वर सांगितलेल्या दिवसांत अनुक्रमें वात, पित्त, कफ यांचें आधिक्य असतें. हा ज्वर त्रिदोष जन्य आहे. यांत वातादि दोष ३ तीन, आणि सप्त धातूंचे दोष ७ सात, मूत्राचा १ व मलाचा १ एकूण १२ दोष असतात. संतत किंवा विषमज्वर क्षीण पुरुषाला फार दिवस येतात.

**उपाय**–१ कडूपडवळ, इंद्रजव, देवदार, गुळवेल, कडूनिंबाची साल, यांचा काढा निकाढा द्यावा.

२ कडूपडवळ, इंद्रजव, धमासा, बाळहिरडे, कुटकी, गुळवेल यांचा काढा द्यावा.

३ इंद्रजव, लोध, धावडयाचेंफूल, नागरमोथे, मोचरस, समभाग चूर्ण ऊन पाण्यांतून ३ मासे द्यावें.

४ आवळकाठी, नागरमोथे, सुंठ, रिंगणीमूळ, गुळवेल ह्यांचा काढा मध घालून व पिंपळीची पूड घालून द्यावा. हा संतताख्य विषमज्वरामज्वराचा नाश करितो.

५ कडूपडवळ, इंद्रजव, देवदार, हिरडा, बेहडा आवळकाठी, नागरमोथे, मनुका, जेष्टमध, गुळवेल, अडुळसा यांचा काढा करून निवाल्यावर मध घालून

द्यावा. म्हणजे संततज्वर, सततज्वर, वगैरे ५ ही प्रकारचे विषमज्वर जातात. याशिवाय दाहपूर्वकज्वर व नवज्वर यांचा नाश होतो.

६ कडूपडवळ, नागरमोथे, अडुळसा, कुटकी, उपळसरी यांचा काढा संततज्वरांत वाताबर द्यावा.

७ अतिविष, काडेचिराईत, कुटकी प्रत्येकीं २।२ तोळे घेऊन चूर्ण करून ४० तोळे आधण पाण्यांत घालून ठेवावें. आणि दिवसांतून ३ वेळां ३।३ तोळे प्रमाणें गाळून द्यावें.

८ ज्वरब्रह्मास्त्र—शुद्ध सोमल २ तोळे घेऊन गोमूत्रांत ३ दिवस भिजत घालावा. गोमूत्र नित्य नवें घालावें. मग स्वच्छ धुवून ठेवावें. हिंवज्वरांत पाळी येण्याच्या पूर्वी मोहरी येवढा सोमल घेऊन २।३ गुंजाभार साखरेंतून द्यावा. ३ दि० म्हणजे नूतन व फार दिवसांचा ज्वरही जातो. संतत व सतत ज्वरही जातात. पथ्य आळणी दूध भात, तूप भात.

९ चंडेश्वर रस— शुद्ध पारा, गंधक व बचनाग, ताम्रभस्म व शुद्ध सोमल, समभाग घेऊन आल्याच्या रसांत ६ तास खल करावा. व ७ दिवसपर्यंत आल्याच्या रसांतच राहूं द्यावा. व नंतर निर्गुंडीच्या पाल्याच्या अंगरसांत ७ दिवस भिजत घालून काढून अर्ध गुंज प्रमाण गोळ्या कराव्या. १ गोळी आल्याच्या रसांतून मध घालून अथवा साखरेंतून द्यावी. म्हणजे तीव्र ज्वर जातो. यास पथ्य नाहीं.

१० दारुब्रह्मरस—सोमल, हिंगूळ, धोत्र्याचें बीं हीं शुद्ध केलेलीं व पिंपळी समभाग घेऊन लिंबू रसांत खलून गुंज प्रमाण गोळ्या करून तुळशीच्या रसांतून द्यावी. १२ वर्षांच्या आंतील मुलास निमे प्रमाण असावें. थंडीवाजून येणाऱ्या संततज्वरांत बडबडूं लागल्यास, अथवा फार घाम येऊं लागल्यास, ताप फार वाढल्यास ह्या औषधाचा उपयोग करावा.

## २ सततज्वर.

*लक्षण*—सततज्वर रात्रीं दोन वेळां येतो. ज्ञानदेव म्हणतात, दिवसां २ वेळां किंवा रात्रीं २ वेळां किंवा दिवसा १ वेळां व रात्रीं १ वेळां एकूण २ वेळां येतो. अमुकच वेळेवर येतो असें नाहीं. अहोरात्रींत १ वेळांही येतो.

१ त्रायमाण, कुटकी, धमासा, पांढरी उपळसरी, ह्यांचा काढा द्यावा. तो सततज्वरांत वातादिकांचें निवारण करितो.

२ कडूपडवळ, बाळहिरडे, निंब, इंद्रजव गुळवेल धमासा यांचा काढा द्यावा तो खोकला व सतत ज्वर घालवितो.

३ कडूपडवळ, त्रिफळा, कडूलिंबाचीं पानें, द्राक्षें, बाहव्याचा मगज, व अडुळसा यांचा काढा करून मध साखर घालून प्यावा. प्रतिदिवशीं येणारा ज्वर जातो.

४ कावळीची मुळी कानास बांधिल्यास रात्रीचा ज्वर जातो.

## ३ महेंद्रज्वर.

**लक्षणें**— जो ज्वर अहोरात्रींत २।३।४ किंवा ५ वेळांही येतो व जातो, त्याला हंसराज निदानांत महेंद्रज्वर नांव दिलें आहे. यांचीं लक्षणें विषम ज्वराप्रमाणेंच आहेत. करितां विषमज्वरावरचेच उपाय करावे. आणि सतत ज्वरावरील उपायही करावे.

## ४ एकाहिकज्वर.

**लक्षणें**— थंडी वाजूनयेते, आंग मोडून येते, जांभया येतात, पाठीच्या कण्यांतून वेग येतात आणि तहान लागते.

शरत् व हेमंत यांत शरत् ऋतु संपल्यावर हेमंताच्या आरंभीं हींवताप येतो. तो कर्दमोत्थ विषजन्य सेंद्रियसूक्ष्मजंतु रक्तांत शिरल्या मुळें येतो. असें प्राच्य व अर्वाचीन वैद्यांच्या मतें सिद्ध झालें आहे. पण हा ताप कांहीं वेळ असतो, व कांहीं वेळ नसतो. ताप नसतो तेव्हां ते जीव कोठें असतात? किंवा त्यांची काय स्थिती होते?

शरीरांतच असतात तर कांहीं वेळच ताप कां येत नाहीं? अगदीं स्वास्थ्य तेवढ्या वेळे पुरतेंच कां असतें ? असे प्रश्न उद्भवतात. आर्य वैद्यकाचें मत असें कीं, ज्वरोत्पादकदोष आमाशयांत आल्यावांचून ज्वर येत नाहीं, तेव्हां अन्य ठिकाणीं दोष राहून आमाशयांत आला ह्मणजे ज्वर येतो. नंतर ज्वराच्या उष्णतेनें दोषाचें पचन होते, त्यामुळें दोष हलका होतो; व हलका झाल्यामुळें स्वस्थानीं जाण्यास त्यास फार वेळ लागत नाहीं. हींवतापाचे प्रकार काल भेदानें ४ होतात. रोज २ वेळ रोज १ वेळ येणारा, त्र्याहिक, मध्यें १ दिवस आड टाकून येणारा, ह्मणजे तिसरे दिवशीं येणारा (त्र्याहिक) व मध्यें २ दिवस टाकून येणारा ह्मणजे चवथे दिवशी ( चातुर्थिक ) या चारीचीं निरनिराळीं स्थानें असली पाहिजेत त्याप्रमाणें पहातां १ आमाशय, २ हृदय, ३ कंठ, ४ शिर अशी कल्पना केली. दोषांचा कुपित होण्याचा काल वाग्भटाच्या वाक्याप्रमाणें दिवसां १ वेळ, रात्रीं १ वेळ, असा २ वेळां असल्याकारणानें आमाशयांत दोष असतो तेव्हां रोज २ वेळां ताप येतो; दोष हृदयांत राहून आमाशयांत येऊन पोंचण्यास १ दिवस लागतो. अशी कल्पना केली म्हणजे सहजच या दोषांमुळें येणारा ताप दुसरे दिवशीं येतो. कंठांतील दोषांस आमाशयापर्यंत येण्यास २ दिवस लागतात, म्हणजे हृदयापर्यंत येण्यास १ दिवस व हृदयापासून आमाशयापर्यंत येण्यास १ दिवस एकूण २ दिवस झाले; यामुळें हा ताप तिसरे दिवशीं येतो त्याला तिजारेंहींव किंवा ( त्र्याहिकज्वर ) म्हणतात. शिर म्हणजे डोकें यांत राहणाऱ्या दोषांस आमाशयापर्यंत येऊन पोहोंचण्यास ३ दिवस लागतात, म्हणजे एक दिवस कंठापर्यंत, एक दिवस कंठापासून हृदयापर्यंत व हृदयापासून आमाशयापर्यंत एक दिवस; म्हणून हा ज्वर चवथे दिवशीं येतो. ज्या दिवशीं ज्वर येतो तो दिवस पहिला धरला म्हणजे हें सर्व कोडें सहज समजतें व जुळून येतें.

### एक्याहिकज्वरावर उपाय.

१ कडूपडवळ, त्रिफळा, कडूनिंबाचीं पानें, मनुका, बाहव्याचा मगज, व अडुळसा ह्यांचा काढा मध व खडीसाखर घालून द्यावा. म्हणजे प्रतिदिवशीं येणारा ज्वर जातो.

२ कुमारीनें कातलेल्या सुतानें अघाड्याच्या मुळीस बांधून शेंडीस किंवा वेणीस बांधावी. प्रतिदिवशीं येणारा ज्वर लवकर जातो.

३ घुबडाच्या उजवीकडला पंख घेऊन पांढऱ्या सुतानें डाव्या कानास बांधावा. एक्याहिकज्वर जातो.

४ चिभूड, सहदेवी, चिकणा, पाथरी, भांग, यांपैकीं कोणतेंही मूळ गळ्यांत बांधल्यास ज्वर जातो.

५ द्राक्षें, कडूपडवळ, कडूनिंब, नागरमोथे, इंद्रजव, त्रिफळा यांचा काढा एक्याहिकज्वर घालवितो.

६ गोकर्णी किंवा ब्रह्मदंडी यांचा रस नाकांत पिळावा. एक्याहिकज्वर जातो.

७ नवसागराचें चूर्ण वाल भर घेऊन साखरेंतून द्यावें. दिवसांतून २ वेळां दि० ३ हटकून गुण येतो.

८ कुटकी, वाळा, धने, मनुका ह्यांच्या काढ्यानें हटकून पाळीचे ताप राहतात.

९ धोत्र्याच्या पानाचा रस शक्तिमान पाहून सव्वा तोळ्यापर्यंत दह्यांतून द्यावा. एकांत्राज्वर जातो.

१० मांदाराचीं फुलें ५ गुळांतून वाटून द्यावी.

### ५ द्व्याहिकज्वर.

**लक्षण**—हा कंबरेपासून पाठीच्या कण्यांतून उत्पन्न होतो. बाकी लक्षणें एक्याहिका प्रमाणें असतात.

**उपाय**—१ कोळ्याच्या जाळ्याच्या सुताची वात करून तिळाच्या तेलांत भिजवून पेटवून काजळ धरावें. याच्या अंजनानें द्व्याहिकज्वराचा नाश होतो.

२ शुद्ध हिंगूळ व बचनाग यांचें चूर्ण १ गुजभर विड्याच्या पानांतून किंवा मधांतून द्यावें म्हणजे

एकयाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक ज्वरांचा नाश होतो.

३ निर्गुडी आणि सहदेवी यांच्या, रविवारीं प्रातःकाळीं शुचिर्भूतपणें मुळ्या आणून कमरेस बांधिल्यानें ज्वर जातो किंवा पांढऱ्या कणेरीची किंवा मांघराची मुळी बांधल्यानेंही जातो

४ अडुळसा, कडूपडवळ, त्रिफळा, द्राक्षें, कडूनिंब, बाहव्याचा मगज, यांच्या काढ्यांत मध व साखर घालून द्यावा. तो द्व्याहिकज्वराचा नाश करितो.

५ आंबट लिंबाच्या फोडी करून नुसत्या पाण्यांत उकळून नुसता काढा पाजावा. दि० ३।७ उत्तम गुण येतो.

६ सर्व पाळीच्या तापांत औषधानें उलटी करवावी हें चांगलें.

७ बेलाच्या मुळावरील सालीचा काढा मध घालून देणें. उत्तम उपयोग होतो.

## ६ तृतीयकज्वर ( तिजारेंहींव )

**लक्षण**—हा तीन प्रकारचा आहे. कफपित्तात्मक तृतीयक असल्यास तो कंबर व पाठीचाकणा यांत उत्पन्न होऊन नंतर शरीरांत प्रवेश करितो. वात कफात्मक असल्यास पाठींतून उत्पन्न होतो वात पित्तजन्य असल्यास मस्तकापासून उत्पन्न होतो.

१ गुळवेल, नागरमोथे, चंदन, वाळा, धणे, सुंठ यांचा काढा साखर मध घालून द्यावा. उत्तम आहे.

२ रक्तचंदन, धणे, सुंठ, वाळा, पिंपळी, नागरमोथे यांचा काढा मध खडीसाखर घालून द्यावा म्हणजे तृतीयकज्वर जातो.

३ रविवारीं आघाड्याची मुळी आणून तांबड्या सुतानें कमरेस बांधावी. तृतीयकज्वर जातो. ( गरोदर स्त्रीस बांधूं नये. )

४ तुरटीच्या लाहीची बारीक पूड हींव येण्याच्या पूर्वी एक तास असतां ३ पासून ६ गुंजा पर्यंत शक्ती पाहून चौपट साखरेंतून द्यावी, वर पाणी पिऊं नये. फार तहान लागल्यास दूध प्यावें. या पासून कोणताही हींवताप जातो. केव्हां केव्हां तर एकाच खेपेस जातो. हा सर्वांत स्वल्प उत्तम उपाय आहे.

५ पारव्याची विष्ठा एक मासाभर घेऊन विड्यांतून द्यावी.

६ कडूनिंबाचीं पानें २॥ व गूळ ६ मासे गोळी करून द्यावी. अथवा त्याच पानांचा अष्टमांश काढा करून गूळ घालून द्यावा. तिजारेंहींव व नारू जातो.

७ कुटकीच्या चूर्णाला रुईच्या चिकाच्या भावना देऊन वाल प्रमाण गोळ्या करून विड्यांतून खावी. ज्वर येण्याच्यापूर्वी १ तास अर्धी गोळी द्यावी.

## ७ चातुर्थिकज्वर ( चवरेंहींव )

**लक्षण**—कफजन्य चातुर्थिकज्वर असला म्हणजे पायांच्या पोटऱ्यांत आरंभ होऊन अंगात ज्वर भरतो. वातजन्य असला म्हणजे मस्तकांत आरंभ होऊन शरीरांत शिरतो. मध्यावस्थेंत दाह करितो. तो पूर्वी किंवा ज्वरानंतर दाह करीत नाहीं. तृतीयक किंवा चातुर्थिक हे ज्वर रोग्याला ज्वराच्या धास्तीनें म्हणजे चिंतनानें येतात. या करितां त्या त्या वेळीं रोग्याच्या मनाला आनंद किंवा भय किंवा दुःख वगैरे होणारे कांहीं तरी उपाय योजून ज्वराच्या धास्तीची वेळ चुकवावी. पाळीच्या दिवशीं उलटी करवावी हें चांगलें.

**उपाय**—१ हिरडा, रिंगणमूळ, वाळा, डोरलीमूळ, आस्कंद मोहाचेंफूल नागरमोथे, सुंठ, अडुळसा, गुळवेल, पित्तपापडा, यांचा काढा करून निवाल्यावर मध व पिंपळीची पूड घालून द्यावा. दि० ७।१४ यानें दाह, घाम, तहान, जंत, रक्तपित्त, शैत्य, श्वास भ्रांति, शूळ, दिवसां येणारा ज्वर, चातुर्थिकज्वर हे जातात.

२ नागरमोथे, पहाडमूळ, आवळकाठी यांचा काढा किंवा त्रिफळाचूर्ण दुधांतून प्यालें असतां चातुर्थिकज्वर नाश पावतो.

३ पांढऱ्या वसूचेंमूळ चूर्ण करून किंवा दुधांत उगाळून प्यावें. किंवा विडयांतून खावें. म्हणजे फार दिवसांचा चातुर्थिकज्वर जातो.

४ ज्वर येण्याच्यापूर्वी जुन्या तुपांत हिंग उगाळून अथवा हदग्याच्या पाल्याच्या रसाचें नाकांत नस्य द्यावें. चातुर्थिकज्वर जातो.

५ पुष्यनक्षत्रीं, लघुकावळी, चिकणा, पिंपळी, माका किंवा अघाडा यापैकीं कोणतेंही मूळ आणून हातास बांधिलें असतां चातुर्थिकज्वराचा नाश होतो.

६ उन्हाळी ( शरपुंखा ) याचा पाला १ तो सुंठ १ मासा, मिरेंदाणे ३ यांची गोळी करून ज्वर येण्याच्यापूर्वी १ तास द्यावी. म्हणजे चातुर्थिकज्वर, मधुराज्वर, हिंवज्वर, व विषमज्वर हीं जातात.

७ हिंग व मीठ १|१ मासा घेऊन बारीक करून २० तोळे पाण्यांत घालून कढवून ५ तोळे उरला म्हणजे द्यावें. दि० ७

८ नवसागर ३ गुंजाभार व २ काळीमिरीं, बारीक खलून ज्वराची पाळी असेल त्या दिवशीं ज्वर येण्याच्या १ तासपूर्वी विडयाच्या पानांतून द्यावें. यानें ३ पाळ्यांत चातुर्थिक जातें.

९ काळ्या धोत्र्याची पानें, विडयाची पानें, मिरीं समभाग खलून २ गुंजा प्रमाण गोळ्या बांधून सकाळ संध्याकाळ १|१ गोळी ऊन पाण्यांतून द्यावी. चातुर्थिकज्वर ४|५ पाळ्यांत जातो.

१० तीनचार मासे चुना पाण्यांत कालवून त्या पाण्यांत लिंबू रस पिळावा म्हणजे घट्ट होतो. नंतर ज्वर येण्यापूर्वी १ घटका असतां त्यांत थोडें पाणी घालून प्यावें. म्हणजे ज्वर येत नाहीं. कदाचित दुसरी पाळी आल्यास याच प्रमाणें करावें. हटकून गुण येतो.

११ कोरफडीच्या रसांत अर्धी गुंज अफू व हळद घालून शिजवून स्वच्छ फडक्यानें गाळून ज्वर येण्याच्यापूर्वी प्यावें. ह्या प्रमाणें २|३ पाळ्या करावें. म्हणजे जुनाट व फार दिवस अंगात मुरलेला चातुर्थिकज्वर जातो. यांत संशय नाहीं. वरील औषधांत थोडी साखर घालून प्यावें म्हणजे पिण्यास बरें पडेल.

१२ कडूलिंबाची अंतरसाल ५ तोळे घेऊन २० तोळे पाण्यांत चेंचून घालून कढवून ५ तोळे उरला म्हणजे गाळून प्यावें. दि० ३|७ चातुर्थिकज्वर हटकून जातो.

१३ कडूनिंबाचीं पानें २१ मिरे २१ कुटून फडक्यांत पोटळी बांधून ४० तो. पाण्यांत घालून कढवून ५ तोळे उरला म्हणजे प्यावा. दि० ३|७ दोहींवेळां द्यावा. सर्व प्रकारच्या ज्वरांचा नाश होतो. हा फार उत्तम योग आहे अवश्य करावा.

## ८ पांच दिवसांचा ज्वर.

मद्रास शहरांत हा ताप अलीकडे नवीनच आढळूं लागला आहे. तो बरोबर पांच दिवस येतो. पांचव्या दिवशीं पायावर पुरळ येतो. मग ताप निघतो. पहिल्या दुसऱ्या दिवशीं ताप १०४ अंश असतो. पण चवथ्या व पांचव्या दिवशीं तो ताप पायांवर पुरळ येतांच फार वाढतो, व नंतर एकदम जातो. हा विषमज्वरापैकींच एक भेद आहे. या पासून बहुत करून मनुष्य दगावत नाहीं. हा सौम्य ताप आहे.

**उपाय**—१ कडूनिंबाचीसाल १ तो. सुंठ -|- तोळा मिरे अष्टमांश तोळा घेऊन त्याचा काढा करून गूळ घालून द्यावा. २—काडेचिराईत, नागरमोथे, सुंठ, धमासा, पित्तपापडा, यांचा काढा द्यावा. ३—कोयनेल लिंबाच्या सरबतांतून देणें.

## ९ पाक्षिक, मासिक, वार्षिक, विषमज्वर.

लक्षण—जसा चातुर्थिकज्वर चवथे दिवशीं येतो, तसा तोच ज्वर अंगांत मुरला म्हणजे केव्हां केव्हां १५ दिवसांनीं किंवा महिन्यांनीं किंवा बरोबर वर्षानेंही नेमका ज्वर येतो. त्यांचीं लक्षणें सर्व चातुर्थिकाप्रमाणेंच होतात. ( हंसराज निदान पहा )

**उपाय**—१ चातुर्थिकज्वरावरील उपाय करावे. २ ज्वर येणेच्यापूर्वी एक सतक सुवर्णमालिनी वसंत

किंवा तृतीयक चातुर्थिकावरील काढा देत असावा किंवा कडूनिंब, रिंगणीमूळ, गुळवेल, सुंठ यांचा काढा निकाढा देत असावें. ३ भूतभैरवरस द्यावा.

## १० एकांगज्वर.

लक्षण—जो ज्वर शरीराच्या एका भागासच येतो ( डाव्या किंवा उजव्या ) त्यास त्या बाजूचें नांव, म्हणजे डाव्याबाजूचाज्वर असल्यास वामांगज्वर, उजव्या बाजूचा ज्वर असल्यास सव्यांगज्वर असें म्हणतात. हा विषमज्वराचा एक भेद आहे.

उपाय—१ त्यास एकांगवीर म्हणून मात्रा महान् वैद्याकडे असते, ती अनुपान योजून द्यावी. अथवा हेमगर्भ किंवा हेमगर्भपोटळी रस द्यावा.

२ कस्तूरी १ मासा, अंबर १ मासा, सोन्याचा वर्ख १ मासा, रुप्याचावर्ख १ मासा, ( अथवा प्रत्येकीं गुंज प्रमाण घ्यावें. ) मधांत खलून वरचेवर प्रहराप्रहरानें गुंजगुंज प्रमाण मधांतून चाटावें.

३ रासना, गुळवेल, येरंडमूळ, देवदार, वेखंड, सुंठ, धमासा, बाळहिरडे; अतिविष, नागरमोथे, शतावरी, अडुळसा यांचा काढा मध घालून द्यावा. दि० ७।१४

४ रासना, पुनर्नवा, सुंठ, गुळवेल, येरंडमूळ यांचा काढा निवाल्यावर मध घालून द्यावा.

५ शुद्धपारा, गंधक, बचनाग समान १।१ तोळा प्रमाणें लवंगा ३ तोळे, जायफळ अर्धा तोळा, शुद्ध जेपाळ २ तोळे, सर्व चूर्ण करून प्रथम पारा–गंधकाची कज्जली करून नंतर सर्व जिन्नस मिसळून ३ दिवस लिंबूरसांत खलून गुंज प्रमाण गोळ्या कराव्या. सावलींत वाळवून एक किंवा २ दोन गोळ्या ऊन पाण्याबरोबर किंवा गुळाबरोबर गोळी खाऊन वर ऊन पाणी प्यावें म्हणजे सर्व प्रकारचे शीतज्वर, विषमज्वर, एकांगज्वर हे जातात, आणि कोष्ठशुद्धी होऊन भूक चांगली लागते दि० ३।७ औषध एक दिवसाआड द्यावें.

६ अर्धनारी नटेश्वर—ह्याचा पाठ सन्निपात–ज्वरांतील औषधाच्या यादींत ४३ व्या अंकांत लिहिला आहे. तो द्यावा. म्हणजे त्या प्रमाणें औषधाची योजना करावी.

## ३२ विषमज्वराचे विशेष भेद.

शरीरामध्यें अन्नाचा रस दुष्ट झाला असतां व कफ आणि पित्त हीं कोपली असतां अर्धा देह कफानें थंड होतो; व अर्धा देह पित्तानें उष्ण होतो. जेव्हां कोठ्यामध्यें पित्त दुष्ट, व कफ हातापायांमध्यें दुष्ट होतो; तेव्हां कमरेवर देहास उष्णता येते. आणि हातपाय थंड पडतात. जेव्हां कोठ्यामध्यें कफ दुष्ट होऊन हातांपायांत पित्त दुष्ट होतें तेव्हां कंबरेवरील देह थंड होऊन हातपाय उष्ण होतात. या वांचून विषमज्वर होत नाहीं. व कफ आणि पित्त नष्ट झाली असतां वायु विशेषें करून शरिरांत संचार करितो. ज्या वेळेस आमाशयांत किंवा नाभिस्थानीं पित्त दुष्ट होऊन रहातें, व कफ, वायु हे त्वचेंत राहतात त्या वेळीं अंतर्दाह आणि बाह्य त्वचेला शीत वाटतें. जेव्हां त्वचेंत कफ, वायु राहतात तेव्हांच थंडी वाजून ज्वर येतो, नंतर त्यांतच पित्त जागृत होऊन शरीराचा दाह होतो. त्याच्या शमाविषयीं कफ, वायु जागृत होऊन थंडी उत्पन्न होते. या दोहोंपैकीं दाह–पूर्वकज्वर दुःख देणारा, आणि अति कष्टसाध्य आहे. व शीतपूर्वकज्वर अल्प कष्टसाध्य आहे.

### विषमज्वराचें असाध्य लक्षण.

जो ज्वर अनेक कारणांनीं उत्पन्न होतो, व त्यांत त्रिदोषांची संपूर्ण लक्षणें असतात, आणि ज्याच्या योगानें रसादि सप्तधातु व इंद्रियें हीं क्षीण होतात, घाम येत असूनही आंत दाह आणि बाहेर शीत हीं लक्षणें ज्या ज्वरांत होतात, तो विषमज्वर असाध्य किंवा घातकही होतो.

## १ वात बलासकज्वर.

लक्षण—रोगी ज्वरानें शोथयुक्त होऊन म्लान होतो. अंग ताटतें, शरीराला रुक्षता, सूज, निरंतर अल्पज्वर, स्तब्धता, कफ फार, हा ज्वर वात कफात्मक जाणावा. यांत कफाचें प्राबल्यामुळें हा मोठ्या कष्टानें साध्य होतो.

उपाय—यावर विशेषें करून वात कफज्वरावरील उपाय करावे.

## २ प्रलेपकज्वर.

लक्षण—गात्रें सारावेळ घामानें चिकट होतात. ज्वर मंद असतो. थंडी वाजते. हा ज्वर कफपित्तजन्य आहे. हा बहुत करून क्षयरोगांत होत असतो. कोणी त्रिदोषजनितही म्हणतात.

१ यास कफज्वरनाशक किंवा पित्तनाशक उपाय करावें.

## ३ शीतपूर्वकज्वर.

लक्षण—कफ आणि वात हे रस धातूचा आश्रय करून पहिल्यानें शीतज्वर उत्पन्न करितात. त्याचा वेग शांत झाला म्हणजे शेवटीं पित्त व दाह करितो. पूर्वी कडक थंडी वाजून येऊन नंतर अंगात ज्वर भरतो. कंबर, हात, पाय, अंग व संधि यांना फूट, ओकारी, बडबड, अरुचि इत्यादि लक्षणें होतात. हा ज्वर पावसाळा संपल्यावर ऋतु बदलल्यानें येतो. ( याविषयीं विशेष विचार विषमज्वरापैकीं एक्याहिक ज्वरांत केला आहे. )

उपाय—सुदर्शनचूर्ण थंड पाण्यांतून द्यावें. ( याचा पाठ सर्व ज्वरावरील औषधांत अंक ३२ यांत लिहिला आहे तो पहावा. )

२ थंडी तापावर इसबंद ( इस्पंद ) म्हणून दुकानांत काळें बारीक बीं मिळतें तें ४ गुंजाभार घेऊन ऊन पाण्यांतून द्यावें. दिवसांतून ३ वेळां दिल्यास हटकून हींव राहतें.

३ चिंतामणी रस—हिंगूळांतून काढलेला शुद्ध पारा, गंधक, अभ्रक, ताम्रभस्म, ( सोमनाथी ) त्रिकटु, त्रिफळा, शुद्ध जेपाळ सर्व समभाग घेऊन आल्याच्या रसांत खलून गुंज प्रमाण गोळ्या करून दरवेळीं १ गोळी आल्याच्या रसांतून किंवा ऊन पाण्यांतून द्यावी. हींवतापावर हें रसायन मोठें वस्ताद आहे. सकाळ संध्याकाळ १।१ गोळी द्यावी. रेच होऊन कोष्ट शुद्धि होते. कफज्वरावरही द्यावी. गुल्म, पोटशूळ, इतर साधारण ज्वर, सर्दी, पडसें, खोकला यांसही चांगला उपयोग होतो.

४ काडेचिराईताचा किंवा कडूनिंबाचा काढा द्यावा.

५ पांढऱ्या गोकर्णीची मुळी लिंबूरसांत उगाळून अंजन करावें.

६ सैंधव, पिंपळी, हिरडा, चित्रक यांचें चूर्ण दरवेळीं १ तोळा ऊन पाण्यांतून द्यावें.

७ शुद्ध हरताळ १ तो. शुद्ध मोरचूद, २ तो. शिंपीचेभस्म ६ तो. एकत्र करून लोखंडाच्या तव्यांत घालून काळ्या धोत्र्याच्या रसानें १ प्रहर घोटून चुलीवर ठेऊन जाळ लावून आटवावा. पुनः रसांत खलून वाल प्रमाण गोळ्या कराव्या. दरवेळीं एक गोळी साखरेबरोबर द्यावी. याला भूतभैरवरस म्हणतात. हा सर्व शीतज्वरांचा तत्काळ नाश करितो. गोळी विड्याच्या पानांतून द्यावी. वांति झाल्यास गुळवेलीच्या रसांत मध घालून द्यावा.

८ बाळहिरडे, इंद्रजव यांचें १ तोळा चूर्ण गुळांतून द्यावें.

९ कुटकीचीपूड रुईच्या चिकांत भिजवावी. खलून गुंज प्रमाण गोळ्या करून हींव येण्याच्यापूर्वी विड्यांतून द्यावी.

१० सज्जीखार रुईच्या चिकांत ६ दिवस भिजत घालून गोळा करून चिंचेच्या पानाची वाटून लुगदी करून त्यांत गोळा घालून त्याबर तुरटी बसवून वर

फडकें गुंढाळून दोरी बांधून १ हाताचा खळगा काढून अग्निपुट द्यावें. भस्म होतें. हें हींवतापास २ गुंजा भस्म साखरेंतून द्यावें रोज ३ वेळां दि० ३

११ गूळ ३ तो. रुईचें पान १ कुटून चतुर्थांस काढा करून द्यावा.

१२ पांढऱ्या वसूच्या पाल्याचा रस किंवा हादग्याच्या ( अगस्त्याच्या ) पाल्याचा रस हींव येण्याच्यावेळीं नाकांत पिळावा. ३।४ थेंब पिळाल्यानें एक्याहिकादीज्वर जातात.

१३ एकदिवसा आड ज्वर येतो त्यास—माक्याची पानें २१ व मीठ १॥ मासा वाटून गोळी करून द्यावी.

१४ कोऱ्या गाडग्यांत १० तोळे पाणी ५ तोळे गूळ घालून रात्रीं ठेवून सकाळीं प्यावें. पित्ताधिक हींव जातें.

१५ अंबेहळद, कडूकारळें, डिकेमाली, कुटकी प्रत्येकीं १।१ मासा घेऊन त्याच्या २ पुडया कराव्या सकाळीं १ पुडी ५ तोळे गोमूत्रांतून द्यावी. रात्रीं १ पुडी साखरेंतून द्यावी. गोमूत्र मानत नसल्यास कोरफडीचा रस किंवा गुळाचें पाणी यांतून द्यावी. एकच दिवसांत हींव जातें.

१६ शीतज्वरांकुश—मोरचूद, पारा, गंधक हरताळ, कलखापरी, टांकणखार, बचनाग हीं सम–भाग शुद्ध घेऊन कारलीच्या रसांतून खल करून गुंज प्रमाण गोळ्या कराव्या. एकेक गोळी आल्याचा रस खडीसाखर, जिरें साखर, किंवा विड्याच्या पानांतून द्यावी. दि० ३।७ ह्यानें सर्व प्रकारचें हींवताप पाळीचे ताप व विषमज्वर लवकर जातात. १, महिना मीठ व गूळ वर्ज. पथ्य दूध, भात, साखर तूप, वरण अळणी.

१७ काळादाणा २ मासे, अतिविष २ मासे, मिरें २ मासे, यांचे चूर्ण करून ६ पुडया कराव्या. रोज ३ वेळां १।१ पुडी ऊन पाण्यांतून २ दिवस द्यावी.

१८ सात्विणीच्या सालीचें सत्व क्विनाईन प्रमाणें काढून दिल्यास चांगला उपयोग होतो. आणि क्विनाईनचे दोष ह्यांत बिलकुल येत नाहींत. म्हणजे भोंवळ येणें, बधिरता, आवाज बसणें, पित्तविकार हे होत नाहींत.

१९ धूप—कोष्ट, कडूनिंब, वेखंड, हिरडा, इंद्रजव, गुग्गुळ, पांढऱ्या मोहऱ्या, राळ, तूप सम–भाग घेऊन त्याचा धूप द्यावा. हा धूप कोणत्याही ज्वरास हितकर आहे.

२० इंद्रजवाची पाव तोळा पूड, पाणी किंवा गूळ किंवा साखर यांतून द्यावी. दि० ३

२१ गुळवेलीचा रस ३ दिवस द्यावा. अथवा शुद्ध हरताळ व चुना खलून गुंज प्रमाण गोळी सकाळी विड्यांतून द्यावी. हींव येण्याच्या वेळीं १ गोळी द्यावी. दि० ३ पथ्य दूध भात. गूळ एक महिना वर्ज.

२२ कळीचाचुना ६ भाग, शुद्ध हरताळ ३ भाग, कोरफडीचा रस १२ तोळे एकत्र खलून उडदा येवढ्या गोळ्या कराव्या. सकाळीं १ गोळी साखरेंतून द्यावी. व हींव येतेवेळीं १ गोळी विड्याच्या पानांतून २ मिरे व लवंगा घालून द्यावी. एक महिना गूळ वर्ज.

२३ सुंठ १ मासा, गूळ १ मासा, चुना १ मासा एकत्र खलून हींव येतेवेळीं देणें.

२४ वीस बिब्बे कातरून तव्यांत घालावे. त्यांत सुंठीचे तुकडे घालून तळून सुंठीचे तुकडे काढून पूड करून दरवेळीं पाव तोळा पूड साखरेंतून द्यावी. हिंवज्वर जातो.

२५ एक तोळा मीठ ४ तोळे पाणी एकत्र करून प्यावें. म्हणजे ताप जाऊन पाणथरीही जाते.

२६ पिंपळीचा अर्क १॥ मासा, पाणी ५ तोळे मिळवून थंडी येण्याच्यापूर्वी पाजावें. दि० ३

२७ काफीचा काढा करून त्यांत लिंबूरस पिळून पाजावें. ३ दि० हटकून गुण.

२८ लसूण भाजून शक्तीप्रमाणें १० किंवा १९ पाकळ्या गुळाबरोबर खाव्या. दि० २ वेळां दि० ३।७ यानें हींव जातें. जीर्णज्वर, प्लीहा, क्षयही जातो. पथ्य नाहीं. तूप अधिक खावें.

२९ काडेचिराईत, सुंठ, बडीशेप प्रत्येकीं १।१ पैसाभार घेऊन त्याचा अष्टमांश काढा करून दिवसांतून ३ वेळां द्यावा. सावकाश पण चांगला गुण येतो. दि० ९।७।३

३० कडूनिंबाचीं पानें, फुलें, साल, मूळ-प्रत्येकीं ३।३ तोळे, सुंठ ९ तो. मिरीं ३ तो. पिंपळी ३ तो. हिरडा, बेहडा, आवळकाठी, संचळ, ओवा, जवखार प्रत्येकीं ३।३ तोळे घेऊन सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण करून दरवेळीं ऊन पाण्यांतून १ तोळा चूर्ण द्यावें. म्हणजे शीतज्वर, एक्याहिक, द्व्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक, दाहपूर्वकज्वर वगैरे सर्व ज्वरांचा नाश होतो. दि० ३।७।१४

३१ करंजाचें बीं, पिंपळी, जिरें, बाभळीचीं पानें समभाग पाण्यांत खलून वाल प्रमाण गोळ्या करून दरवेळीं १ या प्रमाणें दिवसांतून ३ गोळ्या साखरेंतून द्याव्या. दि० ७

३२ अफू १ गुंजभार कडूलिंबाचीं पानें २॥ गूळ १ पैसाभार घेऊन खूप खलून २ गोळ्या करून ज्वर येण्याच्यापूर्वी १ व हींव येतेवेळीं १ गोळी द्यावी. एकच दिवसांत हींव जातें. कारण पडल्यास दुसरे दिवशीं असेंच द्यावें.

३३ तिळवणीचा पाला वाटून गजग्या येवढी गोळी करून उजव्या हाताच्या मनगटाच्या नाडीजवळ मोठी शीर असते तिजवर ठेऊन वर खापरी किंवा पैसा ठेऊन फडक्याच्या चिंधीनें घट्ट बांधावें. हें थंडी येण्याच्या आधीं २ घटका करावें. म्हणजे थंडी येतच नाहीं. दुसरे दिवशीं सोडून फोड उठल्या जागीं जखम होतें त्यास खोबरें जाळून लावावें.

३४ तुरटी भाजून लाही करून ती समान साखर घालून खलून ठेवावी. शक्तिमान पाहून ४ गुंजापासून १० गुंजाभारपर्यंत द्यावी. ज्वर, खोकला, कफ जातो.

३५ पत्रीं हरताळ भस्म पाव किंवा अर्धी गुंजभार विड्याच्या पानांतून द्यावें. एकच दिवसांत हींव जातें. ( भस्माची क्रिया रसायन प्रकरणांत पहा. ) पण एक सप्तक दूध भात, तूपरोटी, सोखर, भाकरी या वांचून कांहीं खाऊं नये गूळ १ महिना खाऊं नये. खाल्यास त्याच दिवशीं थंडी वाजून ज्वर येतो.

३६ शुद्ध बचनाग, शुद्ध हिंगूळ, मिरीं, पिंपळी, टाकणखाराची लाही, समुद्र फळाचें बीं, अक्कलकार, सुंठ समभाग घेऊन विड्याच्या पानाच्या रसांत सात दिवस खल करावा गुंज प्रमाण गोळ्या करून शक्तिमान पाहून १ किंवा २ गोळ्या विड्याच्या पानाच्या रसांतून द्याव्या. म्हणजे एक्याहिकादि सर्व ज्वर जातात.

३७ तिळवणींचीं पानें व मिरीं समभाग खलून वाल प्रमाण गोळ्या करून सकाळ संध्याकाळ १।१ गोळी विड्याच्या पानांतून द्यावी. सर्व प्रकारचे शीतज्वर जातील.

३८ कारलीच्या पाल्याचा रस २।३ गुंजाभार टांकण खाराची लाही घालून २।३ तोळे शक्तिमान पाहून पाजावा. उलटी किंवा जुलाब होऊन ज्वर जातो.

३९ रुईचें कोवळें पान विड्यांतून द्यावें.

४० कुड्याची साल, गुळवेल, अडुळसा, लघु उंदीरकानी, निर्गुडी, माका, सुंठ यांचा काढा निकाढा द्यावा. शीतज्वर जातो. दि. ३।७

४१ पारिजातकाचा कोंवळा पाला व गूळ वाटून सुपारी येवढी गोळी करून खावी. वर पाणी पिऊं नये. ज्वर येण्याच्या पूर्वी २ तास हें औषध द्यावें.

४२ निवडुंग, घेन, सुंठ, गुळवेल, नागरमोथे, पद्मकाष्ट, रक्तचंदन, किराईत, कडूपडवळ, अडुळसा

पुष्करमूळ, कुटकी, इंद्रजव, कडूनिंब, पित्तपापडा, भारंगमूळ, समभाग औषधांचा काढा निकाढा दिल्यानें सर्व प्रकारच्या शीत ज्वरांचा नाश होतो.

४३ अंतरिततापास–अतिविषाचें चूर्ण मधांतून किंवा थंड पाण्यांतून १ किंवा दीड मासा द्यावें.

४४ घाणेऱ्या करंजाची पूड दर वेळीं २ मासे पर्यंत दिवसांतून २।३ वेळां द्यावी शीत ज्वर जातो.

४५ क्विनाइन बरोबर ओव्याचा अर्क दिल्यास ज्वर उलटत नाहीं. किंवा गजग्यांतील बी व मिरीं वाटून द्यावीं. कोयनेल पेक्षां चांगला गुण येतो.

४६ पारा, गंधक, जेपाळ हीं शुद्ध घेऊन आणि टांकणखाराची लाही, सैंधव, मिरीं, चिंचेच्या टरफलाची राख, सर्व साखरनिंबाच्या रसांत खलून २ गुंजा प्रमाण मात्रा १ दिवस उष्णोदकांतून द्यावी. शीतज्वर एकच दिवसांत जातो.

४७ कडू निंबाची अंतरसाल २ तोळे, मिरें २ मासे ह्यांचा काढा करून दिवसांतून ३ वेळ पाजावा. ३ दिवसांत हींव कायमचें जातें. शिवाय तापांतील अनेक उपद्रवही शमतात.

४८ ज्वरांत मस्तक दुखत असल्यास–तांबड्या कणेरीचीं फुलें, आवळकाठी, धणें, वेखंड, कोष्ट ह्यांचें चूर्ण ऊन पाण्यांत कालवून मस्तकास लेप करावा. मस्तक दुखणें बंद होतें.

### ४ अंतर्वेगज्वर लक्षण.

शरीराच्या आंत दाह, फार तृषा, बडबड, श्वास, भ्रम, सांधे व हाड यांत शूळ, घाम येत नाहीं, वायू आणि मळ यांचा अवरोध, हीं लक्षणें होतात. हा दुःसाध्य आहे.

१ यावर पित्तशामक असे विषम ज्वरावरील उपाय करावे.

### ५ बहिर्वेगज्वर लक्षण.

बाहेरून फार दाह, तृषा, भ्रम, श्वास, कास, हे दोष अल्प असतात. हा ज्वर सुखसाध्य आहे.

१ यावर साध्या तापावरील उपाय योजावे.

### ६ दाहपूर्वक ज्वर.

**कारण व लक्षण**—प्रथम रसधातूगत पित्त होऊन अत्यंत दाह करितें नंतर त्याचा वेग शांत झाला ह्मणजे वात, कफ संयोगानें शैत्य करतात. दाह पूर्वक आणि शीत पूर्वक हे दोन्ही ज्वर त्रिदोषाच्या संबंधानें होतात. त्यांत दाह पूर्वक ज्वर दुःखप्रद व कष्टसाध्य आहे. आणि शीत पूर्वक ज्वर सुखसाध्य आहे. कारण शीत ज्वराला उष्णोपचार करितां येतात; दाह पूर्वक ज्वराला अतिशीतोपचार करितां येत नाहींत. दाह पूर्वक ज्वरांत अंगाचा दाह, मन स्वास्थ्य नसणें, निद्राभंग, ज्वर फार येणें, मस्तकपीडा हीं लक्षणें होतात.

**उपाय**–१ बेहडे, बाहव्याचा मगज, कुटकी, तेड, बाळहिरडे, यांचा काढा तहान, दाह, व सर्व विषमज्वराचा नाश करितो, दाह शमन होतो.

२ येरंडाचीं पानें जमिनीवर पसरून त्यावर निजवून वर पुनः येरंडाचीं पानें घालून वर पातळ पांघरूण घालून घटकाभर राहूं द्यावें. मग सर्व काढून शीतज्वरावरील काढा द्यावा.

३ दाह ज्वरिताला उताणा निजवून त्याच्या नाभीवर तांब्याचें किंवा काशाचें भांडें ठेवून त्यांत थंड पाण्याची धार धरावी. यानें दाह शांत होऊन सुख होतें.

४ ज्वरांतील कोणत्याही दाहास—ज्या मात्रेंत बचनाग आहे, ती मात्रा द्यावी. दाह खचीत शमतो.

५ धने कुटून रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं गाळून त्यांत गुळवेलीचें सत्व व खडीसाखर घालून द्यावें.

६ हिरडा, खैराचीसाल, मंजिष्ट, पिंपळाचीसाल, आवळकाठी, बेहडेदळ, बाव्याच्या शेंगेतील मगज, वडाचीसाल यांचा काढा करून पांच तोळे उरवून निवाल्यावर मध घालून द्यावा. रात्रीं निकाढा द्यावा.

७ कृष्णागरुचंदन १ तोळा, पांच तोळे पाण्यांत उगाळून घ्यावा.

८ तापांतील अंतर्दाहावर—काळ्या उंबराच्या मुळ्या २ तोळे ( काकोदुंबर ) व २ तोळे मनुका यांचा काढा करून प्रहरा प्रहरानें २।२ तोळे पाजावा म्हणजे अंतर्दाह, पित्त, शोष शमतें.

९ धने, जिरे, कापूरचिनि, वेलदोडे, शाजिरे, बडीशेप, व वाळा समभाग वस्त्रगाळ चूर्ण करून गुलाब पाण्यांत गोळ्या चण्या येवढ्या कराव्या. व पित्तपापडा व मनुका ह्यांच्या काढ्यांतून गोळी घ्यावी. दाहपूर्वकज्वर जातो. व ह्याच गोळ्या तांदळाच्या धुवणांतून घेतल्यास लघ्वीची आग जाते.

### ७ गंभीरज्वर लक्षण.

अंतर्दाह, तृष्णा, दोष प्रबल असणें, श्वास, खोकला हीं लक्षणें ज्या ज्वरांत असतात त्यास गंभीरज्वर म्हणतात.

उपाय—१ यावर सर्व पित्तनाशक उपाय करावे.

२ सुवर्ण माक्षिकभस्म आल्याच्या रसांत व मधांत २ गुंजाभार घालून देणें.

३ सूतशेखर मात्रा आल्याच्या रसांत खडीसाखर घालून द्यावी. प्रमाण १।२ गुंजा उगाळावी. मध, मोरआवळयाचाहीं कारणपरत्वें उपयोग करावा.

४ पित्तज्वरावरील काढे द्यावे. मोरआवळ्यांतून सुवर्णमाक्षिक द्यावें.

---

## ३३ सप्त धातुगतज्वर.

लक्षण—१ रसधातूगतज्वर झाला असतां जडपणा, हृदयस्थ दोष, ओकून पडेलसें वाटणें, अवयवास ग्लानि, ओकारी, अरुचि, आणि उदासपणा, हीं लक्षणें होतात.

### १ रसधातुगतज्वरावर उपाय.

१ रसधातुगतज्वर झाला असतां वमन व लंघन करावें घाम काढावा.

२ त्रिफळा, ओवा, रिंगणीमूळ, हळद, वेळूचें बीं, अडुळसा ह्यांचा काढा करून मध घालून द्यावा. म्हणजे रसधातुगतज्वर जातो.

### २ रक्त धातुगतज्वर.

लक्षण—रक्त मिश्रित थुंकीं, ओकारी, अंगाची आग, मोह, भ्रम, असंबद्ध भाषण, अंगावर पुटकुळ्या, आणि तहान हीं रक्तधातुगतज्वराची लक्षणें होत.

१ खैर, त्रिफळा, कडूपडवळ, कडूनिंब अडुळसा गुळवेल, ह्यांचा काढा मध व तूप घालून द्यावा. हा रक्त दोषांवर अप्रतिम आहे.

२ त्रिफळा, ओंवा, हळद, रिंगणीमूळ, वेळवाचें बीं, अडुळसा यांचा काढा मध घालून द्यावा. रस-रक्तधातूपासून झालेल्या दारुणज्वराचा नाश करितो.

३ अडुळसा, धमासा, पिंपळी, पित्तपापडा, किराईत व कुटकी यांचा काढा मध घालून द्यावा. म्हणजे रक्तमिश्रितज्वर, दाह, तृष्णा, मूर्छा, मतिभ्रंश व पित्तज्वर यांचा नाश होतो.

४ रक्तधातुगतज्वरास अंगावर पाणीं शिंपडणें, ज्वरनाशक औषधें देणें, लेप करणें, रक्त काढणें, हे उपचार विशेषेंकरून करावें.

### ३ मांसगतज्वर.

लक्षण—गुडघ्याच्या खालीं पोटऱ्यांत मांसाचे गोळे येतात. तहान लागते, मळमूत्र हीं बहुत होतात. उष्मा व अंतर्दाह होतो. हातपाय अस्ताव्यस्त हलवितो. शरीरास ग्लानि येते इत्यादि मांसगत-ज्वराची लक्षणें होत.

उपाय—१ मांसगतज्वर झाला असतां, तीक्ष्ण रेचक द्यावें.

### ४ मेदगतज्वर.

लक्षण—अंगास अत्यंत घाम, तहान, मूर्छा, बडबड, ओकारी, अंगास गांधी, अरोचक, ग्लानि,

थोड्या कारणांनीं फार राग येणें, हीं मेदगतज्वराचीं लक्षणें होत.

उपाय—पुष्कळ घाम काढावा. लंघन करवावें.

## ५ अस्थिगतज्वर.

लक्षण – हाडांत ठणका, थुंकणें, दमा, ढाळ, ओकारी, हातपाय अस्ताव्यस्त चाळविणें, हीं अस्थिगतज्वराचीं लक्षणें जाणावीं.

उपाय—१ अस्थिगतज्वरांत वांतिनाशक औषधें द्यावीं. बस्तिशोधक औषधें द्यावीं. अभ्यंग करावें (औषधेंयुक्त तेल, तूप चोळावें) उध्वर्तन हे उपाय करावे.

२ सोनतरवड (पिंपळातरवड) ह्याच्या पाल्याचा रस किंवा काढा गुळवेलीचें सत्व ४ गुंजाभार घालून दोहीं वेळां ४।४ तोळे प्यावा. अस्थिगतज्वर जातो.

३ गुळवेलीचें सत्व १ मासा, दूध साखरेंतून द्यावें. दि० २१

४ लवंगा, पिंपळी, पांढरीवसु, यांचा अष्टमांश काढा करून देणें. दि० २१

५ सोनामुखी (पाला) सुंठ, जिरे, वावडिंग समभाग घेऊन चूर्ण करून त्यात समान साखर मिसळून अर्धं किंवा १ तो. घेणें. वातपित्ताधिक अस्थिज्वराचा व पोटफुगी, उचकी, वांति, अंगदाह, श्वास, कास जातात.

## ६ मज्जागतज्वर.

लक्षण—अंधःकारांत गेल्यासारखें वाटणें, उचकी, खोकला, अतिशैत्य, ओकारी, अंतर्दाह, महाश्वास, आणि वृषण, ललाट, हृदय, डोळ्यांचे आंख या मर्मस्थानीं फार व्यथा होते.

उपाय—यावर चांगलें औषध मिळालें नाहीं. हा असाध्य आहे. कदाचित् दैववशात् साध्य होतो.

## ७ शुक्र धातुगतज्वर.

लक्षण— शुक्रस्थानीं ज्वर गेला असतां, शिश्नाचा ताठरपणा, व वीर्याचा क्षणक्षणा बहुस्राव होतो. हा प्राणी वांचत नाहीं.

उपाय— १ मज्जाशुक्रधातुगतज्वर झाला असतां त्यावर उपाय सांगितले नाहींत; कारण तसला ज्वर झाला असतां रोगी वांचत नाहीं. दैव पहाण्या करितां खटपट करावी.

२ आंबळकाठीं गुळवेल यांचा काढा यांत किंवा ओल्या आंवळ्याच्या रसांत मध व माक्षिकभस्म घालून द्यावे.

३ इसबगोळ रात्री पाण्यांत अर्धं तोळा भिजत घालून सकाळीं त्यांत खडीसाखर १ तोळा व मध अर्ध तोळा घालून द्यावा. शुक्रस्राव बंद होतो.

### सप्त धातुगतज्वराचा साध्यासाध्य विचार.

रस, रक्त, मांस, मेद या धातुगत झालेला ज्वर औषधानें साध्य होतो. आणि अस्थिमज्जागत झालेला ज्वर दुःसाध्य होतो. आणि शुक्रधातुगतज्वर झाला असतां मरण येतें.

---

## ३४ जीर्णज्वर. (हाडीज्वर)

लक्षण—पूर्वी मोठा ज्वर येऊन २१ दिवस लोटल्यावर तो ज्वर बारीक होऊन अंगांत रहातो. त्यापासून पोटांत कवळू (पानथरी, प्लिहा, पी.) होते व जठराग्नि मंद होतो, त्याला जीर्णज्वर ह्मणतात. त्याचीं उपेक्षा केली असतां पुढें पांडु, क्षय, उदर वगैरे होतात. जीर्णज्वरांत दिवसेंदिवस आहार कमी होत जातो, अन्न पचत नाहीं. शौचास साफ होत नाहीं. हाडें धगधगीत लागतात, तोंडास पाणी सुटतें, शुक्र किंवा रजधातु पातळ व क्षीण होते. जीर्ण ज्वर जरी एकदांच फारशी पीडा करीत नाहीं तरी उत्तरोत्तर अति पीडाकारक होऊन प्राणनाशक रोग उत्पन्न करितो. जीर्णज्वरी रोग्यानें उपवास किंवा लंघन करू नये. आणि जीर्ण ज्वरीताला वमन किंवा विरेचन देऊं नये.

उपाय— १ शाजिरें १० भार, खारीक बी

काढून २० भार, जिरे ९ भार एकत्र कुटून सुपारी येवढ्या गोळ्या कराव्या. रोज दोहीं वेळां १।१ गोळी खावी. दि. २१ पथ्य दूध भात.

२ बेलाच्या किंवा जाईच्या मुळाचा दुधांत काढा करून २१ दिवस घेतला असतां असाध्य व कठीण जीर्ण ज्वराचा नाश होईल.

३ कुटकीचीपूड दरवेळीं मधांतून द्यावी. दि० ७।१४

४ जिऱ्याचीपूड १॥ मासा, व जुना गूळ अर्ध तोळा गोळी करून खावी. वर पाणी पिऊं नये. दि० १४।२१ दोहीं वेळां.

५ कोंवळे बेलफळ, किरामणी ओंवा, टाकळी, पहाडमूळ, टेंटू यांचा काढा निकाढा घेतला असतां जीर्णज्वर, पोटशूळ, माथेशूळ, श्वास, कास ह्यांचा नाश होतो. दि० १४

६ पिंपळी १ पट व दुप्पट जुना गूळ घालून कुटून सुपारी येवढ्या गोळ्या करून सकाळ संध्याकाळ १।१ गोळी खावी. दि० १४।२१ येणें करून जीर्णज्वर, अग्निमांद्य, अजीर्ण, खोकला, अरुचि, कृमि, श्वास यांचा नाश होतो.

७ गुळवेलीचा काढा करून पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा. दि० १४।२१ यानें कफयुक्त जीर्णज्वर जातो.

८ गुळवेल, सराटे, सुंठ यांचा काढा मध साखर घालून द्यावा. म्हणजे जीर्णज्वर जाऊन धातु वृद्धि होतें, क्षुधा लागते. दि० ७।१४

९ सैंदेलोण, पादेलोण, डिकेमाली, कुटकी, ३।३ मासे, हिंग १ मासा, कडूखजूर २ मासे, खारीक १ लवंग ७ सर्वांचें चूर्ण करून अर्धे भाजून अर्धे हिरवें एकत्र करून शक्तिमाना प्रमाणें १ तोळ्यापर्यंत घेऊन पाण्यांत कालवून त्यांत खापरी तापलेली विझवून प्यावें. दि० ७

१० चांगल्या गुळवेलीच्या कांड्या ४ तोळे ठेंचून रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं तें पाणी गाळून प्यावें. जीर्णज्वर जातो.

११ कोहाळेपाक, जिरेपाक, खर्जूरपाक, बदामपाक, ह्यांतून एकादा पाक द्यावा. दि० २१ (ह्यांची कृति पाक प्रकरणांत पहा.)

१२ जिरे, पिंपळी समान चूर्ण करून तापलेल्या दुधांत पावतोळा चूर्ण व खडीसाखर अर्ध तोळा घालून प्यावें. दि० २१।२८ हे उत्तम आहे.

१३ तुळशीच्या पाल्याच्या काढ्यांत खडीसाखरेचें चूर्ण घालून प्यावें. दि० ७।१४

१४ मनुका, गुळवेल, कचोरा, काकडाशिंगी, नागरमोथे, रक्तचंदन, सुंठ, कुटकी, पाडळमूळ, किराईत, धमासा, वाळा, धने, पद्मकाष्ट, काळ वाळा, रिंगणीमूळ, पोखरमूळ, कडूनिंब यांचा काढा निकाढा दिल्यास जीर्णज्वर, अरुचि, श्वास, कास व सूज यांचा नाश होतो.

१५ लघुमालिनी वसंत—घोड्याच्या मुतांत कलखापरीचें चूर्ण २१ दिवस घालून ठेवावें. दररोज नवें मूत्र घालावें, व उन्हांत ठेऊन वाळवावें. नंतर त्याचें वस्त्रगाळ चूर्ण ८ तोळे, पांढऱ्या मिऱ्याचें चूर्ण ४ तोळे, व हिंगूळ ८ तोळे, सर्व खलून त्यांत गाईचें लोणी २ तोळे घालून एकजीव होईपर्यंत खलावें. नंतर सर्व लोण्याचा ओषटपणा जाईपर्यंत रोज लिंबूरस घालून १०० लिंबें खपेपर्यंत खलावें. त्याची मात्रा २ वाल प्रमाण घेऊन मध व पिंपळीची पूड घालून सकाळीं व संध्याकाळीं द्यावी. म्हणजे जीर्णज्वर, संग्रहणी, अतिसार, क्षय, अर्श, ताप, शूळ, अग्निमांद्य, वातविकार, प्रदर, रक्तार्श, विषमज्वर, नेत्ररोग ह्यांचा नाश होतो. पथ्य, दूध भात, तूप, रोटी, साखर.

१६ वर्धमान पिंपळी—गाईचें दूध पावशेर, पाणी अर्धपाव घेऊन त्यांत ९ पिंपळ्या घालून सर्व पाणी अटेपर्यंत शिजवून त्यांत खडीसाखर घालून प्यावें. ह्यांत रोज २।२ पिंपळ्या अधिक चढवाव्या;

या प्रमाणें ७ सात दिवस वाढवून त्याच क्रमानें ७ दिवस कमी करीत जावें. पिंपळ्या शिजून मऊ होतात त्या सोसल्यास त्यांतच चुरडून घालाव्या. न सोसल्यास अर्ध सोसल्यास तितक्याच घालाव्या. तितक्याही न सोसल्यास काढून ठेवून त्याच मधांतून खलून खाव्या, हें उत्तम. यानें खोकला, अजीर्ण, अरुचि, श्वास, हृद्रोग, पांडुरोग, कृमि, मंदाग्नि, विषमाग्नि, जीर्णज्वर, क्षय यांचा नाश होतो.

१७ खारका ४२ घेऊन भिजत घालून स्वच्छ पुसून डेखें व बिया काढून त्यांत बडीशेप भरून २ तोळे लवंगाचें चूर्ण घालून सर्व कुटून ४२ गोळ्या करून २१ दिवस दोहीं वेळां १।१ द्याव्या.

१८ उतरंडीच्या पानाचा रस १ तोळा काढून मध घालून द्यावा. दि० ७।१४

१९ गाईच्या दुधांत सुंठ, खारीक, मनुका यांचें चूर्ण व तूप घालून आटवून द्यावें.

२० बेहडयाच्या झाडाच्या सालीचें सावलींत वाळवून चूर्ण करून दररोज दरवेळीं ६ मासे चूर्ण व तितकीच साखर दुधांत घालून ऊन करून प्यावें. दि० २१

२१ जीर्ण ज्वरास उत्तम आपट्याची साल, कडूनिंबाचा पाला, बोरीचा पाला, उंबर, पिंपरी, यांचा पाला प्रत्येकीं ३।३ तोळे घेऊन अष्टमांश काढा करून दर प्रहरानें ३।३ तोळे प्यावा दि. १४

२२ जीर्णज्वर, अशक्तता व बाळंतिणीचे विकार यांस--पिंपळी १ तो. लोहभस्म १ तो. त्रिफळाचूर्ण ६ तो. सर्व मिसळून मध तुपांतून शक्ति पाहून ३ पासून ६ मासेपर्यंत दरवेळीं घेऊन गाईचे किंवा शेळीचें दूध प्यावें.

२३ अडुळशाचीं पिकली पानें २ तो. रिंगणी-मूळ २ तो. काढा करून त्यांत तूप १ पैसाभार गूळ १ पैसाभार घालून देणें.

२४ मधुमालिनी वसंत—प्रवाळभस्म २ तो. शुद्ध हिंगूळ २ तो. शुद्ध कलखापरी ४ तो. मिरीं १ तो. पिंपळी १ तो. बेलदाणे, कचोरा, गहुला, वावडिंग, टांकणखार, कोष्ट, केशर हीं सर्व १।१ तोळा घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करून सर्व मिसळून त्यांत २ दोन तोळे लोणी घालून खलून नंतर लिंबू रसांत ७ दिवस खलावें. गोळ्या १।२ गुंजाप्रमाण कराव्या. त्याचें जीर्णज्वर, कावीळ, पांडुरोग, क्षय, अशक्तता, कृमि विकार यांवर अनुपान योजून द्यावें.

---

## ३८ मधुराज्वर.

### ( मंथरज्वर, मोतीज्वर )

**कारण व लक्षण**—ज्वरांत तूप जास्त खाणें, जडान्न खाणें, किंवा ओशट पदार्थ खाणें, किंवा घामाचा रोध करणें, म्हणजे शीतोपचार करून किंवा वारा घेऊन घाम येण्याचा बंद करणें, इत्यादि कारणांनीं हा ज्वर उत्पन्न होतो यांत दाह, ज्वर, भ्रम, मूर्छा, तृषा, अतिसार, वांति, निद्रा नाश, तोंड, टाळा व जीभ यांस शोष, हीं मोठ्या ज्वराप्रमाणें असून त्यांत विशेष ओळखण्यासारखीं चिन्हें म्हणजे गळा व मान यांजवर पांढऱ्या मोहऱ्याप्रमाणें पुटकुळ्या येतात. ह्या पुळया ज्वर उत्पन्न झाल्यापासून ७।१०।१२ दिसूं लागतात. त्याची पूर्ण होण्याची मुदत २१ दिवसाची असते. प्रथम मानेवर पुरळ दिसूं लागतो. मग छातीवर, मग मांड्यावर व पायावरही उठतात. मग इतर ठिकाणीं येऊं लागतात. त्या पांढऱ्या सफेत असतात; म्हणून ह्यास कोणी मोतीज्वर म्हणतात. यांत रोगी बडबडतात, वेड्यासारखे चाळे करितात म्हणून त्यास वेडामधुरा असें म्हणतात. छातीवर व पोटावर पुळ्या उठतांना ताप फार जोराचा असतो. हा येऊं लागला असतां प्रथम गोंवराचा भास होतो. पण गोंवराच्या पुरळाचे पुंजके असतात. व ह्या मधुऱ्याचा पुरळ विरळ असतो. ह्या तापांत गोंवराप्रमाणेंच दाह असतो यामुळें उष्णोपचार सोसत नाहीं. हा विशेषें करून उन्हाळ्यामध्यें येतो. आणि थोरांपेक्षां लहान मुलांत फार आढळतो.

तापाचा जोर रात्रीं फार असतो. याचीं औषधेंही वैद्यांनीं निराळीं योजिलीं आहेत; परंतु माधवाचार्य यास पित्तज्वरांत लेखितात, कारण त्याचीं लक्षणें पित्तज्वराप्रमाणेंच असतात. पुरळ उठणें येवढेंच कायतें अधिक असतें.

**उपाय**—१ पित्तज्वरांत विशेष उपाय सांगितलें आहेत ते करावे.

२ रक्तचंदन, वाळा, काळा वाळा, धने, पित्त–पापडा, सुंठ, नागरमोथे यांचा काढा द्यावा.

३ ब्रह्मदंडीच्या मुळयाचा रस अर्धवाटी पाजावा. तत्काळ गुण येतो.

४ त्रिफळा, लवंगा, राजहंसी ( वनस्पति कोश पहा ) वडाचीं पानें, सुंठ समान घेऊन काढा निकाढा द्यावा. दि० ७

५ मधुराज्वर बाहेर पडण्यास—काडेचिराईत ३ तोळे, वेखंड ३ तो. घेऊन अष्टमांश काढा करून त्यांत फडकें भिजवून पोटावर घालावें. ज्वर लवकर बाहेर पडतो.

६ रानबाभळीच्या शेंगा ( येडबाभूळ ) व जिरे यांचें समभाग चूर्ण अर्धतोळा घेऊन ऊन पाण्यांतून द्यावें.

७ मनुका, पित्तपापडा, बाहव्याचा मगज, कुटकी, नागरमोथे, बाळहिरडे यांचा काढा द्यावा.

८ प्रथम कडूलिंबाच्या पाण्यानें स्नान घालावें. म्हणजे सुख होऊन कंडू सुटत नाहीं, आणि तापही कमी होतो. तापाची मुदत कमी होते. मानेवर वगैरे पुळया दिसूं लागतांच हा उपाय करावा.

९ मनुका, पित्तपापडा, नागरमोथे, खारीक, गुळवेल ह्यांचा काढा सकाळ संध्याकाळ द्यावा.

१० उतरंडीच्या वेलाचें पान घेऊन विड्याच्या २ पानांतून खावें. दि० ७

११ गाजराच्या पाल्याचा वाटीभर रस पाजावा. लहानास कमी द्यावा. दि० ७ पण स्त्रीस देऊं नये.

१२ जोंधळयाच्या लाह्याचा काढा साखर घालून द्यावा.

१३ खुळा ऊस उशाशीं ठेवावा. ( हा ऊस खाल्ला असतां भोंवळ किंवा घेरी येते. म्हणून याला खुळा ऊस म्हणतात. )

१४ नारळाची नवी करटी गाईच्या शेणाच्या रसांत उगाळून खसखस घालून द्यावी. म्हणजे मधुरा जातो.

१५ तुळशीचा रस, गाईच्या शेणाचा रस, जिरे, मेलेली माशी हीं खलून द्यावी. अथवा सांबराचे शिंग, रक्तचंदन, जिरे, नागरमोथे, गाईच्या शेणाच्या रसांत खलून गाळून द्यावें. मधुरा जातो.

१६ कुडयाची साल, काडेचिराईत, वेलदोडे, कमलाक्ष, गाईच्या शेणाच्या रसांत वाटून द्यावें. मधुरा जातो.

१७ गाढवाच्या लिदीचा काढा करून द्यावा.

१८ दोन तोळे म्हशीच्या दुधांतून उडदा येवढें गोरोचन द्यावें म्हणजे ज्वर बाहेर पडतो. व गोंवराचा संशय रहात नाहीं.

१९ रुद्राक्ष मधांत उगाळून चाटवावें. अथवा अजमोद्याचें चूर्ण मधांतून द्यावें. अथवा नागरमोथे, जेष्ठमध, मनुका पित्तपापडयाचा काढा मध घालून पाजावा. माशी मारून गुळांतून द्यावी.

२० वडाचीं पानें, बाजरीचें पीठ यांचा काढा गूळ घालून द्यावा.

२१ पुदीना, रानतुळस, काळी तुळस ( कृष्ण तुळस ) यांचा रस काढून खडीसाखर घालून द्यावा. अ. गुळवेलीचा काढा मध घालून देणें.

२२ विषम, मधुरा, सन्निपातज्वर यांत डोके फार तापल्यास मेंदु बिघडून रोगी बेशुद्ध होण्याचा संभव असतो. म्हणून बर्फाची पिशवी डोकीवर ठेवावी. अथवा बर्फाच्या पाण्याची घडी ठेवावी. आराम वाटतो. यानें डोक्यांत रक्तसंचय कमी होऊन

डोके शांत होतें. व वायु होण्याचें भय टळतें. ज्वरांत डोके जितके थंड ठेवावें तितकें उत्तम आहे.

---

## ३६ कृष्णमधुराज्वर.

**लक्षण**—ज्वर, नेत्रांना झांपड, दांत, ओठ, कंठ, मुख, जिव्हा, नासिका हीं काळीं होतात. डोळे चित्रवर्ण दिसतात. हा ज्वर क्वचित् पाइ-ण्यांत येतो. बाकी लक्षणें मधुऱ्या प्रमाणेंच असतात.

**उपाय**—१–हिंग, कासवाची पाठ, वेलदोडे, तुळशीचीं पानें, नारळाची करटी, अंब्याची कोय, खसखस हीं औषधें समभाग गाईच्या शेणाच्या रसांत करटी उगाळावी व बाकीचीं औषधें वाटून गाळून पिण्यास द्यावी. म्हणजे कृष्णमधुराज्वर शांत होतो.

२ पणदें गवत ( कुत्रे गवत ) ( कोश पहा. ) व कडूनिंबाच्या काडया यांचा काढा करून ४ तोळे पाजावा. पथ्य, भात, वरणाचें पाणी. इतर वर्ज.

३ निंबकाडया, हळद, बडीशेप, धने रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं वाटून गरगट करून गाळुन पिण्यास द्यावें.

४ काळी तुळस, रानतुळस, पुदीना, पित्तपापडा, ह्यांचा रस किंवा काढा तीन किंवा ७ दिवस द्यावा.

---

## ३७ कृष्णमूत्रज्वर.

**लक्षण**—लघ्वी काळसर होते, गढूळ असते, लघ्वीचेवेळीं कळ मारते, लघ्वी फार किंवा थोडी होते आणि वरचेवर होते, यकृत बिघडलें असतें, हा रोग यकृत बिघडल्यापासूनच होतो.

**उपाय**—१-एक तोळा कुटकी, अच्छेर पाण्यांत घालून काढा करावा, चतुर्थांश राहिला म्हणजे गाळुन त्यांत १ तोळा साखर घालून त्यांत आरोग्य वर्धिनी गुटिका उगाळुन द्यावें. पथ्य दूध भात. आरोग्य वर्धिनी गुटिकेचा पाठ " रसरत्न समुच्चयांत २० व्या अध्ययांत सांगितला आहे " २ यकृतावरील औषधेंही द्यावी. ३ यकृतावर बाह्य लेप, शेवग्याची साल, मोहरी, पांढऱ्यावसूचें मूळ, सुंठ, देवदार यांचे चूर्ण ताकांत कालवून लेप करावा.

---

## ३८ कृष्णज्वर.

हा ज्वर आमच्या देशांत नव्हता, पण आलीकडे इजिप्त ( आफ्रिका ) अमेरिका इकडून दळणवळण वाढत गेल्यामुळें सांसर्गानें इकडेही सांथ केव्हां केव्हां येते. तरी हा ज्वर पाणथळ जागीं व अति थंड जागीं म्हणजे विशेषें करून आसामांत दार्जिलिंग, तेराई, मिरत, अमृतसर ह्या भागीं आढळतो. हा तीव्र स्पर्श संचारी आहे. ह्यांत रक्तांतील तांबडे कण फार लवकर नाश पावतात. ह्या मुळें मनुष्य लवकर काळवंडतो. जोरानें थंडी वाजून ताप येतो. पण मलेरिया ( हिंवज्वर ) चें व याचें अगदीं भिन्नत्व आहे. कृष्णज्वरांत वांत्या होतात, कावीळ होते, त्वचेचा वर्ण काळसर होतो, किंवा पिंवळट निसत्व होतो. मूत्रांत एक प्रकारचे जंतु असतात पण हे मलेरियाप्रमाणें एकाच प्रकारचे नसतात. आणि हे मलेरियाच्या जंतूहून अगदीं भिन्न आहेत. हा ज्वर उन्हाळ्यांत किंवा पावसाळ्यानंतर एकदम हवा बदलतांच येतो. हा ताप किती मुद्दतीचा आहे हें नक्की सांगतां येत नाहीं. तरी साधारण मुदत ८ दिवसांची आहे; तरी कित्येक महिनाभरही कुचमलेले आढळतात.

हा ज्वर येतेवेळीं १।२ दिवस डोकें दुखतें, चैन पडत नाहीं, मळमळतें, तोंडास पाणी सुटतें, हा शीतज्वरासारखा एकाएकींच येतो. यांतही जोराची थंडी वाजून येते, यामुळें याचा थंडीतापाप्रमाणेंच भास होतो, व वैद्यही फसतात. प्रथम थंडीवाजून मग १०३।४।५ अंशपर्यंत ताप चढतो. तहान लागते, वांति सुरू होते, पाणीसुद्धां पोटांत ठरत नाहीं, वांतीतून पित्त पडतें, तें पिवळट असतें, पाठीच्या कण्याशीं, त्रिकास्थी जवळ फार दुखतें,

यकृत व प्लीहा वाढते, व दुखते; मूत्र काळसर तांबडें व दाट होतें. ताप भरतो, उतरतो व पुन: भरतो; पण हीं लक्षणें सर्व साधारण होतात. मूत्र नुसतें पाहिलें तरी काळसर दिसतें, पण उजेडांत पाहिलें असतां तांबूस काळसर दिसतें. व कांहीं वेळ स्थीर ठेऊन पाहिल्यास पिंवळट तांबूस रंगाचा सांखा खालीं बसतो. जास्त वेळ ठेवल्यास तांबूस खर दिसते

साध्यासाध्य विचार—ह्या ज्वरांत अनेक तऱ्हेच्या अनेक भावना म्हणजे इतर ज्वरांतील सर्वच तऱ्हा असतात. पण कोणांत कांहीं, कोणांत कांहीं अशा आढळून येतात. या मुळें परीक्षा करण्यास फार जड जातें. तरी अधिक शक्तिपात, नाडीच्या ठोक्याचें विषम प्रमाण, छिन्नश्वास किंवा ऊर्ध्वश्वास, उचकी, तंद्रा, मोह, भ्रम, अस्वस्थता हीं लक्षणें वाढलीं असतां २।३ किंवा फार झालें तर ६।७ वे दिवशीं मृत्यु पावतो. पण यांहून सौम्य लक्षणें, ज्वर घर–सोडीनें येणें, कांहीं दोष कमी होत जाणें, मन:स्थी–रता अशीं कांहीं चिन्हें चांगलीं दिसल्यास रोगी जगतो असें समजावें.

मलेरिया ( हिंवताप ) यावर क्विनाईन उत्तम लागू पडतें पण कृष्णज्वरावर क्विनाईन ( कोयनेल ) चा कांहींच उपयोग तर होत नाहींच पण ताप उलट जास्तच होतो. प्रत्येक पाळींत पहिल्यापेक्षां सौम्य प्रकार दिसून येऊं लागल्यास साध्य, चढाचा येऊं लागल्यास कष्टसाध्य किंवा असाध्य समजावें.

उपाय—१ गुळवेलीच्या अंगरसांत मध किंवा साखर घालून देणें.

२ राजचंडेश्वर, पंचवक्त्र, पंचसूत, नवज्वरेभ-सिंह, त्रिभुवनकीर्ति, कालकूट, ज्वरमुरारी ह्या पैकीं एकादी मात्रा योग्य प्रकृतीशीं साम्य पाहून अनुपान बदलून द्यावी.

३ मूत्राच्या विकृत परिणामांत—उशीरासव, उशीरादिकशाय, किंवा कुशकाशादि काढा, द्यावा.

४ शठ्यादिकशाय द्यावा. ( कचोरा, सुंठ, देवदार, पित्तपापडा, रिंगणीमूळ, कुटकी, काडेचिराईत, नागर-मोथे, धमासा ) यांचा काढा मध, पिंपळीसह देणें.

५ नुसत्या कडूनिंबाच्या सालीचा काढा मिऱ्याची पूड घालून द्यावा. हा उपाय सर्वांचेपेक्षां चांगला लागू पडतो.

६ अडुळसा, कडूनिंब, रिंगणीमूळ, पित्तपापडा, लकड्यापाषाणभेद, सराटे, सुंठ ह्यांचा काढा मध किंवा साखरेशीं देणें.

पथ्य—पातळ कण्हेरी, साबुदाणा, गोडताक साखर, संत्रे वगैरे फळें, झोंप, निवालेलें पाणी.

अपथ्य–सर्व वावडे पदार्थ, द्विदळधान्यें, जडान्न ( पचण्यास कठीण, ) आंबट, तेलकट, तिखट पदार्थ.

---

## ३९ दुर्जलजनितज्वर.

लक्षण—प्रवासांत नित्य नवें पाणी प्याल्यानें, जंगलांतील किंवा इतर विहिरींतील पाणी पानेंपडून कुजून नासलेलें असतें, व तें जंगलांतील कित्येक विषारी झुडपांच्या मुळ्यांतून व कुजलेल्या पदार्थांतून वाहत आलेलें असतें. असलें पाणी प्याल्यानें, अथवा स्नान केल्यानें व कपडे धुणें वगैरे इतर व्यवहार केल्यानें, व इतर ठिकाणचें डबक्यांतील किंवा लहान ओढ्यांतील घाणेरडें पाणी प्याल्यानें किंवा वापरल्यानें ज्वर उत्पन्न होतो. याला इंग्रजींत मलेरि-अस्फीवर म्हणतात. याचीं लक्षणें थंडीतापाप्रमाणेंच साधारण असतात तरी हा ताप अव्यवस्थेमुळें विकोपासही जातो. याचें नीट निदान करून औषध दिल्यास साध्य आहे.

प्रो. रास यांनीं हिंवज्वराच्या जंतूंचा ( म्यालेरि–आपारासाईट ) शोध लावून असें सिद्ध केलें आहे कीं, एक प्रकारच्या डांसांच्या द्वारें हे जंतु मनुष्यांच्या शरीरांत शिरून हिंवज्वर उत्पन्न करितात. ह्या शोधानें प्रो. रास यांनीं जगावर महत् उपकार केले आहेत. ह्या शोधामुळें हिंवज्वराचे बाधेचें ठाम कारण समजून

त्यावर खात्रीचे उपचार करितां येऊं लागले आहेत. सर्व ज्वरास विशेषतः हिंवज्वर, पाळीचे ताप, प्लेग वगैरे हे विषारी जंतुपासूनच होतात, असें आतां मायक्रासकोप ( सूक्ष्मदर्शक ) यंत्रानें स्पष्टच झालें आहे. त्यांत शंका घेणेचें मुळींच कारण नाहीं. आणि सर्व वैद्यांनीं त्या धोरणानींच आपलीं औषधें ठरवावी. आपल्या आर्य वैद्यकांतील औषधांचे गुणधर्म तपासून पाहूं लागलों तर तीं वरील धोरणांचीच आहेत; असें कबूल करावें लागतें.

**उपाय**—१ हिंवताप ( मलेरिया ) व दुर्जलजनितज्वर-यांत क्विनाईनपेक्षां निर्गुंडीच्या पाल्याचा उपयोग चांगला होतो. याचा अनुभव घेतला आहे. निर्गुडीच्या पाल्याच्या अंगीं ज्वर नाशनाची शक्ति उत्तम आहे निर्गुंडीचीं ओलीं पानें घेऊन हातानें चुरून वस्त्रांत पोटळी बांधून ज्वर येण्याच्यापूर्वी ४।५ तास आधीं वरचेवर जोरानें हुंगावीं. आणि पानांचा रस ४।५ थेंब नाकांत पिळावा व जोरानें वर ओढावा. म्हणजे आश्चर्यकारक गुण येतो. हा प्रयोग पूज्यपाद गुरूनीं लिहिला आहे.

२ कडूपडवळ, नागरमोथे, गुळवेल, अडुळसा, सुंठ, धने, किराईत, कुटकी ह्यांचा काढा निकाढा मध घालून द्यावा.

३ हिरडेदळ, कडूनिंब, सुंठ, सैंधव, व चित्रक यांचें चूर्ण थंड पाण्यांतून द्यावें.

४ सुंठ, मोहऱ्या व हिरडा यांचें चूर्ण भोजनापूर्वीं पावतोळा खावें म्हणजे नाना देशाचें पाणी पिऊन आलेला ज्वर जातो

५ काडेचिराईत, तेड, वाळा, पिंपळी, वावडिंग सुंठ, कुटकी ह्यांचा काढा करून निवाल्यावर मध घालून द्यावा. तो दुर्जलजनितज्वरास तत्काळ घालवितो.

६ सुंठ, जवखार यांचें चूर्ण ऊन पाण्यांतून ३ मासे द्यावें. म्हणजे अनेक जलाच्या उपयोगानें आलेला ज्वर जातो.

७ हळद व जवखार यांचें चूर्ण ऊन पाण्याशीं द्यावें. तें अनेक देशींच्या जलापासून आलेल्या ज्वराचे दोषांचा नाश करितें.

८ इंद्रजव १६ भाग, पित्तपापडा ४ भाग, जायफळ ९ भाग, पांढरें येरंडमूळ १ भाग घेऊन त्यांचें चूर्ण करून त्यांत समान साखर मिसळून द्यावें. यानें जलसंबंधीं दोष व दोषज्वर जातात.

९ शुद्ध बचनाग २ भाग, कवडीभस्म ९ भाग, मिरें ९ भाग, या सर्वांचें चूर्ण वस्त्रगाळ करून आल्याच्या रसांत खलून मुगा येवढ्या गोळ्या कराव्या. दोन वेळां १।१ गोळी पाण्याबरोबर द्यावी. म्हणजे अजीर्ण, पोटशूळ, पोटफुगणें, मलावष्टंभ, शूळ, दमा, खोकला, दुष्ट जलापासून झालेला ज्वर यांचा नाश करील. याला दुर्जलजेता रस म्हणतात.

१० जंतामुळें किंवा दूषीजलापासून झालेल्या ज्वरास—जिरें १ तोळा, बाभळीचीं पानें ३ तोळे, गजग्याचें बीं ९ तोळे, पिंपळी १ तोळा, सर्व चूर्ण करून कडूनिंबाच्या पाल्याच्या रसांत खलून हरभऱ्या येवढ्या गोळ्या कराव्या. दर ३ तासांनीं पाण्याबरोबर २।२ गोळ्या द्याव्या.

११ कृमिजन्यज्वरावर उपाय—बेलाच्या पानाचा रस मधांतून द्यावा.

१२ कडूनिंबाच्या पानाच्या काढ्यांत मिरपूड व टांकणखार हीं ४।४ गुंजांभार घालून पाजावा. हा सर्वांत श्रेष्ठ उपाय आहे.

---

## ४० उलटलेलाज्वर.

**लक्षण**—ज्वर निघाल्यावर अपथ्य केल्यानें ज्वर पुनः येऊं लागतो. त्यांत दाह, शैत्य, मस्तकशूळ, पोट फुगणें, कंडू, कमरेंतशूळ, रेच होणें, किंवा मलबद्धता हीं लक्षणें होतात. ज्या पदार्थांच्या विशेष सेवनानें ज्वर उलटलेला असेल, त्याच्या प्रतिकारास योग्य असें औषध योजावें. ( अजीर्ण मंजिरी पहा. )

**उपाय**—१ कुटकी, वाळा, चिकणामूळ, धने

पित्तपापडा, नागरमोथें यांचा काढा उलटलेल्या ज्वरावर प्रशस्त आहे.

२ कुटकी ‑।।‑ तो. वाळा १ तोळा, नागरमोथे १ तो. यांचा काढा खडीसाखर घालून द्यावा. म्हणजे खाचित उलटलेलाज्वर जातो.

---

## ४१ ज्वरांत होणारे उपद्रव.

ज्वर असतांना किंवा गेल्यावरही कमीजास्त मानानें श्वास, मूर्छा, अरुचि, वांति, तृष्णा, अतिसार, मलबद्धता, उचकी, खोकला, आंगमोडून येणें हे १० उपद्रव होतात. पण मूळज्वर शांत झाल्यावर हे आपोआप जातात. करितां प्रथम ज्वर घालविणाऱ्या औषधांची योजना करावी. त्यांत वरील दहा उपद्रवांपैकीं ज्यांचे प्राबल्य जास्त असेल त्यांस घालविणारें औषध असावें. प्रत्येक ज्वरांत सगळेच उपद्रव असतात असें नाहीं. ज्वराच्या मानानें कांहीं कमजास्त असतात. हे खाली दिलेलें उपद्रव सामान्यपणें सांगितले आहेत.

वरील १० उपद्रवांचा उपशमाकरितां थोडे थोडे उपाय खालीं लिहिले आहेत, त्यानें निर्वाह झाल्यास दरें. अथवा जास्त उपायांची जरूर लागल्यास त्या त्या प्रकरणांत पाहून चिकित्सा करावी.

१ श्वासावर‑‑पिंपळी, कायफळ, काकडशिंगी यांचे चूर्ण मधांतून चाटले असतां मोठ्या उग्रश्वासाचा नाश होतो. २ श्वासकुठार द्यावा. ३ रिंगणीमूळ, डोरलीमूळ, धमासा, कडूपडवळ, काकडशिंगी, भारंगमूळ, पुष्करमूळ, कुटकी, कचोरा, कैरेथा ( उत्तर हिंदुस्थानांत प्रसिद्ध. ) या १० औषधाचा काढा सन्निपातापासून झालेल्या श्वासाचा नाश करितो.

२ मूर्छेवर‑१ ज्वरांत मूर्छा आल्यास आल्याच्या रसांत गूळ घालून नस्य द्यावें. २ मधांत सैंधव व मिरे, मनशील उगाळून अंजन करावे, म्हणजे मूर्छेचा तत्काल नाश होतो. ३ सुगंधधूप किंवा फुलें हुंगावी. ४ काशाच्या वाटीनें हातपाय घासावें. किंवा मध पिंपळीची पूड चाटवावी. ५ रिंगणीचीं फळें सुंठ पिंपळी यांचें वस्त्रगाळ चूर्ण नळीवाटें नाकांत फुंकावें, मूर्छा जाऊन सावध होतो. ६ केळीचीं कोवळीं पानें अंगावर ठेवावी.

३ अरुचि‑‑१ आल्याच्या रसांत सैंधव घालून चाटवावें २ महाळुंगाचा गर व सैंधव गोळी करून तोंडांत धरावी. ३ आवळकाठी पाण्यांत उगाळून जिभेस चोळावी. ४ आवळकाठी, मनुका व साखर यांचा कल्क तोंडांत धरावा.

४ वांतिवर‑‑१ पिंपळाच्या झाडावरील सुक्या खरपुड्या जाळून पाण्यांत विझवून तें पाणी गाळून पाजावें. २ गुळवेलीचा काढा किंवा अंगरस थंड झाल्यावर मध घालून द्यावा. ३ चंदनाचें गंध साखर घालून पाजावें. ४ साळीच्या लाह्या, पत्रज, बोराचें बीं, नागरमोथे, चंदन, दारुहळद यांचें समभाग चूर्ण अथवा काढा निवाल्यावर मध घालून द्यावा. ५ अननस खावा. वांति रहाते आणि तो पाचक असल्यामुळें ज्वरास हितकारक होतो. आणि याचें अंगीं मूत्रल व घाम आणण्याचा आणि दाह शमविण्याचा गुण आहे.

५ तृषेवर‑‑१ वाळा, पित्तपापडा नागरमोथे, सुंठ, रक्तचंदन वडाच्या पारंब्या समभाग घेऊन काढा करून ठेवून थोडाथोडा पाजावा. २ वायु होण्याचें चिन्ह नसल्यास थोडा बर्फाचा तुकडा खाण्यास द्यावा. ३ पिकलेलीं तुतें खाण्यास द्यावीं. ४ मनुका, जेष्ठमध, खडीसाखर कुटून गोळी करून तोंडात धरणेस द्यावीं. ५ नारळाचें पाणी पाजावें म्हणजे तहान जाऊन अन्नाचा अंशही पोंचल्यासारखा होतो.

६ अतिसार‑‑१ पहाडमूळ, गुळवेल, पित्तपापडा, नागरमोथे, सुंठ, किराईत, इंद्रजव यांचा काढा दिल्यास निश्चयानें ज्वरातिसार जातो. २ आंवरक्त अतिसारास‑‑तुरटी २ मासे, वेलदाणे ‑।।‑ तो. बाळंतशोपा १ तो. जायफळ १ दिव्यावर भाजून घ्यावें. सर्व एकत्र चूर्ण करून १ किंवा २

मासे पूड तुपांतून, दुधांतून किंवा पाण्यांतून द्यावी. ३ कबाबचिनी कापूर. वेलदोडे, डाळिंबाचें बीं, पिंपळी, मिरे, शेपा, जायफळ समभाग चूर्ण करून साखर मिसळून वरचेवर १।१ पैसाभार देणें. ४ कुड्याची साल, पित्तपापडा, किराईत, कुटकी ह्यांचा काढा गूळ घालून दिला असतां अतिसार व ज्वर हीं जातात. ५ इसबगोल रात्रीं पाण्यांत १ पैसाभार भिजत घालून सकाळीं साखर घालून द्यावा. अथवा काढा करून गूळ किंवा साखर घालून द्यावा. ज्वरातिसार जातो ६ साखर, राळ. आवळकाठी, धायटीचें फूल, बेलफळ यांचें चूर्ण, पोस्ताच्या ( खसखसीच्या बोंडाच्या ) काढ्यांतून द्यावें. ७ कणेरीचें मूळ, धोत्र्याचें बीं, रिंगणीचीं फुलें, हिंगूळ, बळबीज, हिरडा, बेहडा, आवळकाठी, बचनाग, कापूर, केशर, लवंग, अक्कलकार, अफू, मिरें, रुमामस्तकी, जायफळ, जायपत्री समभाग चूर्ण मधांतून अथवा विड्याच्या पानांच्या रसांत खलून गोळ्या १॥ माशाच्या करून मधांतून द्यावी. इटकून ज्वरातिसार दूर होतो; तोंडावर तेज येते, अग्नि, बळ, वीर्य हीं वाढतात.

७ मलावष्टंभ—१ ज्वरांत मलाचा अवष्टंभ झाला असतां सारक अशा तीव्र औषधांची वात करून गुदांत घालून शौचास साफ होईल असें करावें. २ खारासाबण किंवा शिकेकाई पाण्यांत उगाळून फडक्यास लेप करून त्याचा काकडा करून कांहीं वेळ गुदांत ठेवावा. म्हणजे मळ साफ होतो. ३ बाळहिरडे, बाहव्याच्या शेंगेतील मगज, कुटकी, तेड, आवळकाठी यांचा काढा मध घालून द्यावा. म्हणजे मलबद्धता व जीर्णज्वर यांचा नाश होतो.

८ उचकीवर—१ ज्वरांत उचकी लागली असतां सैंधव पाण्यांत विरघळून त्याचें नस्य द्यावें. २ हिंग निर्धूम निखाऱ्यावर टाकून त्याचा धूर तोंडांत घ्यावा. ३ वाळलेल्या घोड्याच्या लिदीचा धूर गिळला असतां मोठी सन्निपातात्मक उचकी घालविते.

९ खोकल्यास—१ ज्वरांत खोकला आल्यास-पिंपळी, पिंपळीमूळ, बेहडेदळ, पित्तपापडा, सुंठ यांच्या चूर्णांचा लेह अडुळशाचा रस व मध घालून द्यावा. २ पोखरमूळ, त्रिकटु, काकडशिंगी, कायफळ, धमासा, ओवा यांचें चूर्ण मधांतून द्यावें. खोकला व कफ जातो.

१० आंगमोडून येणें—ज्वरांत आंगमोडून आल्यास—१ सुंठ व येरंडमूळ ह्यांचा काढा गूळ घालून द्यावा २ घाम काढावा. ३ रबरी पिशवींत ऊन पाणी भरून सोसेल तसें शेकावें.

---

## ४२ ज्वरांतील आणखी इतर उपद्रवास उपाय.

**१ घाम येत नसल्यास-आणण्यास-व घामापासून फायदे**—घाम आल्यापासून अंगातील दूषित पाणी असलेले निघून जातें. अंगांतील उष्णता कमी जास्त होऊं न देतां तशीच ९८·६० सारखी कायम रहाते. अंगांतील वाईट व झीज आलेले पदार्थ बाहेर जातात. मूत्र पिंडाचें व यकृताचें काम बरेंच हलकें होतें. तरी पण जास्त घाम आल्यास शरीरांतील व त्वचेंतील पोषकक्षार नाहींसे झाल्यानें थकवा येतो. करितां घाम बेताचाच काढावा. घाम बेताचा काढल्यानें त्वचेचे रोग होत नाहींत. म्हणून घाम योग्य असा निघाल्यावर त्वचा घासून, पुसून, धुऊन स्वच्छ ठेवावी. असें न केल्यास नायटे, खरूज इसब, गजकर्ण वगैरे त्वचेचे रोग होतात. फार थंडी किंवा वारें लागल्यानें त्वचेंतील तोंडाची रंध्रे बंद होऊन घाम न गेल्यानें रोमरंध्राजवळील बारीक रक्तवाहिन्या संकुचित होऊन त्यांत रक्त सांखळतें. व ताप जास्त होतो. करितां त्या वेळीं घाम काढणें अवश्य आहे. रोग्यांच्या घामाचे २ प्रकार आहेत. एकाद्या रोगांत ( विशेषतः ज्वरांत ) शेवटीं घाम येऊन रोग साध्य होतो. रोगाचा शेवट होण्याच्या थोड्या अगोदर घाम येऊन रोग कमी न होतां दुणावतो. व रोग ( ताप ) असाध्य होतो. हा दुसऱ्या

प्रकारचा घाम फार येऊन असाध्यत्व सुचवितो. पहिल्या प्रकारचा घाम आला म्हणजे ज्वराचीं लक्षणें कमी होऊन नाडी सुधारूं लागतें, अंग उबदार होतें, चित्त स्वास्थ्य होऊन, झोंप येऊं लागते. अशा प्रकारचा घाम बहुत करून ७।१४।२१।४२ व्या दिवशींच येतो. हा शुभसूचक आहे. कारणावांचून जास्त घाम येणें अशक्तता सूचक होय.

## २ असाध्य सूचक घामाचीं लक्षणें.

१ सकाळीं किंवा पहाटें घाम येणें, घाम येऊनही ज्वर भरणें ( हें संतत ज्वराचें लक्षण होय. ) २ तापांत दुर्गंधयुक्त घाम घेणें, हे सन्निपातज्वराचें लक्षण समजावें. ३ तापांतील घामास आंबूस वास येऊं लागल्यास मधुरा किंवा आमवातज्वर समजावा. ४ नुसत्या कपाळावर किंवा फार झालें तर छातीपर्यंतच घाम आल्यास तो ज्वर कष्टसाध्य समजावा. केव्हां केव्हां याचा परिणाम वाईटही होतो. ५ थंडगार घाम येणें हे शक्तिपाताचें लक्षण असून मृत्यु सूचकही आहे ६ थोडा वेळ घाम येणें आणखी ज्वर भरून आणखी थोडा वेळ घाम येणें हें वाईट लक्षण आहे. ७ तोंडावर व कपाळावर मात्र घाम येणें हें जठर बिघडल्याचें लक्षण असल्यामुळें ज्वराचें असाध्यत्व होणें हें साहजीक आहे. ज्वर पुष्कळ असूनही घाम फार येणें व तोंड, कान, नखाच्या खालचा भाग हीं काळवट दिसूं लागल्यास त्याची जगण्याची आशा नाहीं कारण त्या भागाच्या काळेपणावरून हृदय अशक्त झाल्यामुळें रुधिराभिसरणही मंदावत चालतें आहे असें स्पष्ट समजावें.

## ३ ज्वरांत घाम येत नसल्यास आणण्यास उपाय.

१ घाम आणणारी औषधें—सोरा, उपरसाल ( अनंतमूळ ) अफू, रुई, द्रोणपुष्पी, देवदार, मालकांगोणी, उनाव, अंकोल, कापूर, कोन्हांटा, टेंटू, नागरमोथे, ऊनपाणी, धमासा, वात नाशक वनस्पतींचा वाफारा ( येरंड, शेवगा, कडूनिंब, निर्गुंडी, माका इत्यादि. )

२ दारुहळदीचा अर्क २ तोळे देऊन रगडून पांघरूण घालावें.

३ मधांतून ४।५ गुंजाभार सोरमीठ चाटवावें.

४ वडाच्या पिकल्या पानांच्या डेंखांच्या काढ्यांत गूळ घालून देणें. घाम लवकर येतो.

५ ज्वरांत देण्याकरितां जो काढा केला असतो तो निवेपर्यंत अंगावर पांघरूण घेऊन त्यांत काढ्याचें भांडे ठेऊन वाफ अंगास द्यावी. नंतर भांडे बाजूस काढून गच्च पांघरूण घालून निजवावें. म्हणजे घाम सुटतो. तो पुसून काढून मग निवालेला काढा ( मध, साखर वगैरे जे घालणें ते ) घालून द्यावा.

६ पाण्यांत थोडी सुंठ घालून उकडून काढून टाकावी व त्यांत जोंधळ्याच्या लाह्यांचें पीठ घालून व थोडा गूळ घालून कढवून पातळ मंदोष्ण असा पाजून अंगावर जाड पांघरूण घालून निजवावें. घाम येतो तो पुसून काढावा.

७ निंबाच्या, बाभळीच्या, चिंचेच्या काड्या प्रत्येकीं १ पैसाभार घेऊन अष्टमांश काढा करून त्यांत त्रिभुवनकीर्तिरस ( मात्रा ) गोळी उगाळून द्यावी. घाम येतो.

८ तुरीचीडाळ अर्धतोळा, बाहव्याच्या शेंगेतील मगज अर्धतोळा, पाणी अच्छेर घालून कढवून अष्टमांश उरला म्हणजे द्यावा.

९ कापूसकाड्याची राख स्वच्छ करून ऊन पाण्यांतून अर्ध तोळा द्यावी.

१० ओंवा अर्ध तोळा, पिंपळी ६ मासे, हळकुंड ३ मासे, लवंगा चूर्ण १ मासा रात्रीं भिजत घालून सकाळीं त्यांत १० तुळशीचीं पानें घालून वाटून गरगट करून त्यांत खापरी तापवून विझवून गाळून त्यांत त्रिभुवन कीर्तिरसाची गोळी उगाळून पाजून वर दाट पांघरूण घालून निजवावें घाम येतो.

११ गोरख चिंचेची २॥ तोळे साल २० तोळे

पाण्यांत शिजवून निम्मा काढा उरला म्हणजे गाळून कुपींत ठेवावा. प्रहरा प्रहरानें पाजून एक दिवसांत संपवावा म्हणजे घाम येऊन निवतो.

१२ गवती चहाचा काढा सुंठ घालून गरम असा पाजून जाड पांघरूण घालून निजवावें. घाम येतो.

१३ पांढरीवसू ( घेटोळी ) १ तोळा, पाणी २० तोळे ह्यांचा काढा करून द्यावा दि० ३ अति घाम येतां व लघवी साफ होऊन ज्वर निघतो.

१४ माका मुळासह आणून ४० तोळे पाण्यांत घालून एका फडक्यांत ५ तोळे ओवा घालून बांधून ती पुडचुंडी त्यांत घालून अष्टमांश काढा करून गाळून त्यांत पिंपळीचीपूड चिमटीभर घालून पाजावा. घाम येऊन कृमिजन्यताप जातो.

१५ चित्रकाच्या मुळीचें चूर्ण ४।५ गुंजाभार घेऊन साखरेंतून द्यावें.

### ४ ज्वरांतील जास्त घाम कमी करण्यास.

ज्वरांत अति घाम आल्यास अशक्तता येते, करितां घाम जाणेस खालीं लिहिलेले उपाय करावें.

**उपाय**—१ भाजलेल्या चण्याचें पीठ किंवा भाजलेल्या भांगेचें चूर्ण किंवा भाजलेल्या कुळथ्याचें पीठ, किंवा भस्मांत वेखंडाची पूड मिसळून तें अंगास चोळावें.

२ कुळथ्या भाजून त्याचें पीठ करून त्यांत हळद व कवड्याउदाचें चूर्ण घालून अंगास चोळावें.

३ ओवा व माका ह्यांचा काढा तीन वेळ पाजावा. घाम बंद होतो.

४ पिंपळी, कायफळ, भांग, वेखंड, ओंवा, कोष्ठ, पुष्करमूळ, सुंठ, कुटकी, पिंपळमूळ, देवदार, मुगाचें पीठ, उडदाचें पीठ, जुनी विटकर, बचनाग, सिरस, कडूभोपळ्याचें चूर्ण, सर्वांसमान रानशेणीची राख सर्व वस्त्रगाळ चूर्ण करून सर्वांगास चोळावें. घाम येणें बंद होतें आणि घाम येऊन गार झालेल्या अंगास उबारा येतो.

५ पिंपळी, गुळवेल, गरुडवेल, कुटकी, ओंवा, रानशेणीची राख वस्त्रगाळ करून शरीरास फासल्यानें फार घाम येणें बंद होतें.

६ गाईच्या रानशेणीची राख व मिठाचे जुनें मडकें यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून लावावें.

७ पित्तापासून घाम फार येत असल्यास—काळ्या धोत्र्याचें बीं जाळून बारीक खलून दररोज १ मासा प्रमाण सकाळीं विड्यांतून द्यावें. दि० ७

८ तुरटीचें चूर्ण ४ गुंजाभार घेऊन ऊन पाण्यांतून द्यावें. किंवा साखरेंतून द्यावें.

९ ब्रह्मदंडीच्या मुळ्या वाळवून चूर्ण करून १ तोळा घेऊन मधांतून द्यावें.

१० वेळवाचा ओला पाला ४।५ पानें ४० भार पाण्यांत घालून अष्टमांश काढा करून गाळून द्यावा. दि० ३ या काढ्यास तूप वर्ज.

११ माळशेणीच्या राखेंत ओंव्याचें चूर्ण घालून सर्वांगास चोळावें.

१२ नाग केशराचें चूर्ण साखरेंतून द्यावें.

१३ भुईतरवडाचें ( सोनामुखीचें ) चूर्ण १॥ मासा घेऊन ताकांतून द्यावें पण ज्वराचा फार जोर असल्यास देऊं नये.

१४ घाम फार येणें, अंग गार होणें, व रुधिराभिसरण अंतरवेगी असेल तेव्हां धोत्र्याच्या पाल्याचा-रस संधेची पळीभर व मध तितकाच घालून द्यावा.

१५ फार घाम व फार अतिसार असल्यास, अफू पावगुंजभार विड्याच्या पानाच्या किंवा तुळशीच्या पानांच्या रसांतून द्यावी.

### ५ ज्वरांत जीभ काळी होते त्यास.

१ काळा खेंकडा जाळून राख करून उडदा इतकी जिभेस लावावी. म्हणजे जिभेचा दोष जातो. आणि कांटे आल्यास किंवा खरखरीत झाली असल्यास सोनामुखीच्या पाल्याचें चूर्ण करून मधांतून चोळावें.

## ६ तापांत ताप भरतो त्यास.

लक्षण—पूर्वी अंगात ताप असून त्यांतच आणखी जास्त ताप भरतो. केव्हां केव्हां उतरतो पण पुनः भरतो. हा ताप दिवसां, तिसरे प्रहरीं जास्त होतो. केव्हां दिवसां येऊन उतरून पुनः अपरात्रीं येतो. हा विषमांतलाच प्रकार आहे. लक्षणेंही विषमज्वरा–सारखींच असतात.

उपाय—१ कचोरा, सुंठ, पित्तपापडा, देवदार, धमासा, नागरमोथे, काडेचिराईत, रिंगणीमूळ, कुटकी, गुळवेल यांचा अष्टमांश काढा करून निवाल्यावर पिंपळीचीपूड व मध घालून पाजावा. हा उत्तम आहे. ह्यानें सर्व दोष कमी लवकर होतात. याला शठ्यादिकशाय म्हणतात

२ देवदार, धनें, सुंठ, रिंगणीमूळ, मोतारिंगणीमूळ शाहत्तरा, गुळवेल यांचा अष्टमांश काढा करून मध घालून द्यावा.

३ मृत्युंजय मात्रा तुळशीच्या रसांतून मध घालून द्यावी.

## ७ त्रिदोषानें वाचा बंद पडते त्यास.

१ मोरचुदाची लाही करून किंचित नाकास लावावी. मृतःप्राय झाला असला तरी बोलेल. २ रुईच्या चिकांत माळशेणीची राख भिजवून वाळवून पूड करून ठेवावी. प्रसंगीं नाकांत फुंकावी शिंका येऊन शुद्धि येते.

## ८ ज्वरांत वायु झाल्यास.

उपाय—१ शेवग्याचा रस १ तो. पिंपळी -।- तो. तूप १ तो. मध -॥- तोळा घालून शक्ती–प्रमाणें द्यावें

२ वायूनें मस्तक चढल्यास – मोहऱ्या व नाच–ण्याचें पीठ गोमूत्रांत घालून मळून दामटी करून एक अंग तव्यावर भाजून मस्तकास बांधावी. वायु उतरल्यावर सोडावी.

३ निर्गुडीचा पाला व मीठ घालून मस्तकीं बांधावा.

४ हेमगर्भ आल्याचा रस व मध यांतून द्यावा.

५ पारा, गंधक शुद्ध घेऊन त्यांची कज्जली करून त्यांत टांकणखार, बचनाग, धोत्र्याचें बीं समभाग घेऊन खलून त्यास धोत्र्याच्याच दियांचा काढा व बचनागाच्या काढ्याच्या ३।३ भावना देऊन अर्धगुंज प्रमाण गोळ्या कराव्या. अनुपान आल्याचा रस व मध योजावें. म्हणजे विषमज्वर, नवज्वर, प्लेग वगैरे साऱ्या तीव्र ज्वरांत उपयोग होतो. रोगी निस्तेज व शक्तिहीन होतो तेव्हां ही मात्रा दिल्यानें उत्तेजित होतो, व हुशारी येते. यानें तापांत होणारा वायु शमतो. ज्वरातिसार, आमातिसार, ग्रहणी, तापांत पोट फुगतें तें ह्या औषधानें उतरतें.

६ मृतोत्थापनरस—पारा, गंधक, मनशीळ, बचनाग, हिंगूळ हीं शुद्ध घेऊन त्यांत अभ्रकभस्म, ताम्रभस्म, लोहभस्म, सुवर्णमाक्षिकभस्म, हरताळभस्म सर्व समभाग घेऊन आम्लवेतस, जंबीर, चांगेरी, चुका, निर्गुडी, इंद्रावारुणी यांची पृथक् पृथक् पुटें देऊन खल करून कापडमांत करून भूधर यंत्रांत ४ प्रहर पचन करावें. नंतर चित्रकाच्या रसांत २ प्रहर खलून गुंज प्रमाण गोळ्या कराव्या. अनुपान आल्याचा रस व मध. ही मात्रा जरी प्रलापक सन्निपातावर योजिली आहे तरी सर्व प्रकारच्या तीव्र तापांत व सन्निपातावर उत्तम उपयोग होतो. सन्नि–पातांतील बेसावधपणा, अतिसार, वात, कंप, बडबड हीं शमतात. रोग्याच्या नाडीची गति सुधारते, व त्यास हुशारी येते. ही मात्रा दिल्यावर सौम्य औषध द्यावें. पथ्य ज्वराचें धोरण पाहून योजावें.

७ ज्वरांत बडबडतो किंवा हळूहळू बोलतो त्यास–तासातासानें अर्ध अर्ध गुंज प्रमाण कापूर द्यावा.

## ९ ज्वरांत मस्तक दुखूं लागल्यास.

उपाय—१ सुंठ व दालचिनी दुधांत उगाळून मस्तकास लेप करावा. शैत्यानें दुखत असल्यास रहातें.

२ उष्णानें किंवा पित्तानें दुखत असल्यास—

रबरी पिशवींत बर्फ घालून मस्तकीं ठेवावा.

३ वातानें दुखत असल्यास—ऊन पाण्याची घडी वरचेवर ठेवावी.

४ ज्वराची उष्णता मस्तकास चढल्यास प्राण-हानी लवकर होण्याचा संभव असतो अथवा मूर्छा, भ्रम हीं होण्याचा संभव असतो करितां थंड पाण्याची घडी मस्तकावर ठेवावी. अथवा वर सांगितल्याप्रमाणें बर्फ ठेवावें. अथवा कोलनवाटरची घडी पुन्हा पुन्हा ठेवावी.

## १० ज्वरांत भ्रम झाल्यास.

उपाय—१ ज्वरांत किंवा इतर वेळीं, चित्तभ्रम होऊन झोंप येत नाहीं. त्यास भांगेचा अर्क १॥ दीड मासा सुमारें तुपांतून द्यावा अथवा १ मासा भांग दुधांतून द्यावी. उतार पेरूचीं पानें.

२ भांग शेळीच्या, गाईच्या दुधांत शिजवून हातापायास व मस्तकास चोळावी. तत्काळ झोंप येते.

३ अफूच्या अर्काची दंडांत पिचकारी द्यावी. पण अवरोध झाला असल्यास देऊं नये.

## ११ जिभेवर कांटा उठतो त्यास.

उपाय—१ सोनामुखी ( भुईतरवड ) चें चूर्ण मधांत खलून जिभेस चोळावें.

२ काळा खजूर मधांत किंवा पाण्यांत उगाळून जिभेस चोळावा ( हा दुकानांत मिळतो. )

## १२ ज्वरी व इतर अजारांत शास्त्रोक्त स्नान घालणें.

इतर सर्व अजारांत स्नान घालणेंच प्रशस्त आहे. पण तापामध्येंसुद्धां निरनिराळ्या प्रकारांनीं ज्वराची उष्णता कमी करण्याकरितां अन्यरीतीनें स्नानाप्रमाणेंच उपयोग होईल अशी प्रसंगोपात योजना करणें फार अगत्याचें आहे. पण सर्वांग एकदम स्नान घालून गार करणे मात्र धोक्याचें आहे. अवगाहन, परीषेक आर्द्रवस्त्र बंधन, थंडलेपन, शीतवस्त्र परीधान, इत्यादि क्रिया, निरनिराळ्या अंगप्रत्यंगाच्या ठिकाणीं फेरफारांनीं करणेंस कांहीं प्रत्यवाय नाहीं. तसेंच कोणत्याही तापांत किंवा विशेषतः विषमज्वरांत मस्तकावर बर्फ किंवा गार पाण्याची घडी अवश्य घालावी, व वरचेवर बदलावी; म्हणजे तापाचा जोर कमी होऊन नाडी शांत वाहूं लागते. परंतु १०० किंवा शंभराहून कमी उष्णता " उष्णता मापक " यंत्रांत आल्यास वरील उपाय तत्काळ बंद करावें. रोग्यास स्नान किंवा शीतल लेप करतेवेळीं थंड पडेल किंवा त्यास थंडी वाजूं किंवा जास्त दुश्चिन्हें दिसूं लागलीं तर वरील उपाय बंद करावे. व ताबडतोब गरम कपडे घालून थोडा शेकशी द्यावा. एकंदरींत समोष्णीकरणाकडे लक्ष असावें. यांत चूक झाल्यास रोगी असाध्य होईल, हें पक्कें ध्यानांत असावें. परंतु जेव्हां तापांत १०९ अंशापेक्षां जास्त अंश पारा चढलेला ( उष्णता मापक यंत्रांत ) दिसून येईल तेव्हां मात्र शीतलेप किंवा मस्तकास शीतोप-चार करणेस अगदीं आळस करूं नये. जेव्हां वायु होऊन रोग्यास उन्मादत्व येतें, त्या वेळीं डोक्यावर घडी ठेवणें. चंदन, वाळा, कापूर यांचा थंड लेप करणें, मस्तकीं बर्फ बांधणें, किंवा वरचेवर थंड पाण्याची घडी ठेवणें, फार अगत्याचें आहे. हा प्रकार अनुभूत आहे. यानें बरेचवेळां यश आलें आहे. कित्येक वैद्य थंडी, खोकला व इतर वगैरेस भिवून वरील उपाय करीत नाहींत पण मी त्यास खात्रीनें सांगतों कीं चतुराईनें हा उपाय अगत्य करावा. आमच्या वैद्यकांत कालकूट, राजचंडेश्वर वगैरे सारख्या जोरदार मात्रा देऊन त्याच्या शांति करितां शीतोपचार करणेस सांगितलेंच आहेत. असें असून वैद्य तसें करण्यास भितात. त्याचें कारण त्यांतील मर्म कित्येकांना माहित नसतें व पुढील जपणुकही त्यांस अवगत नसतें. करितां सर्व वैद्यांनीं अशा वेळीं पोटांत उष्णवीर्याच्या मात्रा देऊन बाह्यतः शीतोपचार करणेस कांहीं हरकत नाहीं. मुख्य तत्व देहाचें समोष्णीकरण हे ध्यानांत असावे.

### १३ ज्वरांत हातपाय वळसात त्यास

उपाय– १ करंबळाच्या साळीचा रस काढून त्यांत मिरपूड खलून हातापायास चोळावें.

२ चिंचेची राड किंवा ताक घेऊन त्यांत हळद व मीठ घालून तळपायास लावून, उलथनें लाल तापवून त्यानें हातपाय भाजूं न देतां बराबर ओरपावे व फडक्यानें पाय पुसून फडकें बांधून ठेवावें. म्हणजे हातपाय वळावयाचे रहातात. हें काम जाणत्या माणसाकडून करवावें.

३ रबराच्या पिशवींत आधण पाणी घालून पायाच्या नळ्या शेकाव्या. रबरी पिशव्या इंग्रजी औषधें विकणाऱ्याच्या दुकानांत मिळतात.

४ बाटलींत कढत पाणी घालून बूच मारून शेकावें.

### १४ हातापायाचा दाह होतो त्यास.

उपाय–१ मेंदीचा पाला बांधावा. २ गांजा (भांग) शेळीच्या दुधांत शिजवून हातापायास चोळावी म्हणजे आग शमून झोंपही येते. ३ काशाच्या भांड्यानें हातपाय चोळावे.

### १५ ज्वरांत थकवा किंवा ग्लानि आल्यास.
### ( शक्तिपात लक्षण. )

रोगी निचेष्ट पडतो, झोंपेत असल्यासारखा भास होतो. शरीर जड व गलित होतें. शोलवत नाहीं, डोळ्यांत झांपड असतें, हीं शक्तिपात झाल्याचीं लक्षणें समजावी.

१ थोडी उत्तम ब्रांडी ( इंग्रजी पिण्याची दारू ) किंवा देशी मद्य द्यावें.

२ किंचित कस्तुरी हुंगवावी.

३ हेमगर्भ मात्रा तुळशीचा रस व मधांत उगाळून द्यावी.

### १६ तीव्रज्वरांत शौचास न झाल्यास.

उपाय—१ दोनतीन तोळे एरंडेल कांजी किंवा पातळ पेज ४० तोळे मिसळून त्याचा बस्ती द्यावा. किंवा बस्ती प्रकरणांतील योग्य काढ्याचा बस्ति द्यावा. २ कित्येक काढ्यांतच सारक औषधांची योजना त्या त्या ज्वर प्रकरणी केलेली आहे. ते ते काढे किंवा औषधें योजावी.

---

### ४३ ज्वरमुक्तीचीं पूर्व रूपें.

लक्षणें––दाहा होतो, घाम सुटतो, भ्रम, तहान, कंप, मळ पातळ होणें, मूर्छा, कण्हणें, व अंगास दुर्गंधी हीं लक्षणें ज्वर जावयाचा असला म्हणजे होतात. परंतु हीं लक्षणें विशेषें त्रिदोष व मोठ्या ज्वर मोक्षाचीं पूर्वीची होत. साधारण एक किंवा दोन दोषांचा ज्वर असतां वरील सर्वच लक्षणें होतात असें नाहीं. आगंतुक ज्वरानंतर नुसता घाम येऊनही ज्वर उतरतो. कित्येक साधारण ज्वर, घाम न येतांच शमतात.

---

### ४४ ज्वरमुक्त झाल्याचीं लक्षणें.

लक्षणें––शरीरास हलकेपणा, क्लम, मोह, ताप हे जातात. मुखाचा पाक होतो ( तोंड येते, ओठावर जहर उठतो. ) कानांनीं चांगलें ऐकूं येतें, घाम येतो, डोकें खाजूं लागतें, अन्नावर वासना जाते, व शिंका येतात. इंद्रियें आपले विषय घेणेंविषयीं समर्थ होतात. चित्ताची स्वस्थता होते, सुप्रसन्नता आणि सर्वोपद्रव शांति हीं ज्वर मुक्तीचीं लक्षणें होत.

---

### ४५ सुखसाध्य लक्षणें.

लक्षणें––ज्या ज्वराचे ठिकाणीं मनुष्याची शक्ति क्षीण होत नाहीं, वातादि दोषांचा कोप फार नसतो, व वर ज्वरांचे जे १० उपद्रव सांगितले आहेत तेही विशेष नसतात, असा ज्वर सुखसाध्य जाणावा.

---

## ४६ असाध्य लक्षणें.

लक्षणें—जो ज्वर आरंभापासून संतत, सतत, इत्यादि रूपें करून विषम झाला, तो; व जो अपरात्रीं येतो तो; व गंभीर हे तीन ज्वर व क्षीण किंवा रुक्ष मनुष्याचा ज्वर हे प्राणनाशक समजावे. २ कपाळ कानशिला यास फार घाम येऊन सर्वांगास मात्र चिकट घाम येतो, व गात्रें थंड पडतात, तो ज्वर प्राणनाशक समजावा. ३ जो ज्वरानें व्याकूळ होऊन मोह पावतो आणि निजला असतां व उठला असतां उठवत नाहीं; व बाहेर थंडी व अंतरीं दाहयुक्तज्वर असल्या ज्वराच्या मनुष्याची जगण्याची आशा करूं नये. ४ कपाळाला थंड घाम, इंद्रियें शिथिल, उठविल्यास मोह पावतो, तो पुष्ट असला तरी प्रयत्नांनीं वांचेल. ५ ज्या ज्वरांत रोमांच उभे रहातात, नेत्र लाल होतात, आणि हृदयांत शस्त्र प्रहाराच्या वेदनेसारखी शूळ, आणि घाबरा व तोंडानें श्वास सोडणारा, अशा प्रकारचा रोग्याचा ज्वर प्राणघातक होतो. ६ ज्याला दुपारच्या पूर्वी मोठा ज्वर येतो, व कोरडा खोकला येतो; बल व मांस नाश पावतात तो प्रेतच समजावा. ७ अकस्मात ज्वरांत दाह, तृषा, मूर्छा, व बलक्षय सांधे ढिले पडणें हीं लक्षणें आसन्नमरणाचीं समजावी ८ पहाटे तोंडास व कपाळास पुष्कळ घाम येतो तो वांचणें कठीण. ९ ज्याला दाट व बुळबुळीत घाम सर्वांगाला येतो व अंग थंड होतें तो तत्काळ मरतो.

---

## ४७ साधारण सर्व ज्वरांवर पथ्य.

जुन्या साठव्या साळीचा भात, खपल्या गव्हाची पोळी, अलाबुखार, यवागु, विलेपी, मंड, तांदळाची पेज, मगाचें व तुरीचें वरण, कर्टोली ( रान कारली ) कारलीं, चाकवत, तवकीर, तांदुळजा, डाळिंब, मनुका, बेदाणा, धनें, तांबड्या तुरी, ऊन पाणी, मूग, मटक्या, ब्राह्मी, लसूण, शेळीचें दूध, गाईचें तूप, दूध, लोणी, कुळीथ, पडवळ, तांबड्या साळी, शेवगा, कोंवळामुळा, मसूर, अमसूल, ओंठाचीं सोलें, पिकलेलें कवट, माठ, साबूदाणा, मध, साखर, खडसाखर, आलें इत्यादि.

---

## ४८ सर्व ज्वरावर साधारण अपथ्य.

अतिभक्षण, जडान्न, दाहकरणारे पदार्थ, वाईट पाणी, खारट, आंबट पदार्थ, तिखट पदार्थ, मोड आलेलें धान्य, पालेभाज्या. तेलकट पदार्थ, तांबूल, कलंगडें, फणस, नवें धान्य, लाडू, झुणका, भजीं, पोहे, पौष्टिक पदार्थ, मिष्टान्न, स्नान, जागरण, तळलेले पदार्थ, व तळतांना त्याचा वास, फोडणीचा वास, थंडवारा, थंडपाणी, थंड पदार्थ, हरभरे, गहूं, वाटणें, पावटे वगैरे जडपदार्थान्न, शिळें अन्न, स्त्रीसंग, मेहनत, श्रम होण्यासारखें कृत्य, इत्यादि.

---

## ४९ ज्वर मुक्तीनंतरची सुश्रुषा.

रोगी ज्वरमुक्त झाला म्हणजे त्याला अमंगळपणा वाटूं लागतो, व अंग खाजूं लागतें या मुळें स्नानाची इच्छा होते करितां प्रथम कडूलिंबाचा पाला किंवा निर्गुंडीचा पाला, गजग्याचा किंवा करंजाचा, किंवा येरंडाचा पाला ह्यांतून मिळतील तितके घेऊन १ घागरभर पाण्यांत घालून एकदोन कढ येईपर्यंत कढवून त्यांत थंड पाणी विसण न घालतां मंदोष्ण होईपर्यंत निवूं द्यावें. नंतर आंतील पाला काढून टाकून रोग्यास निवाऱ्याच्या जागीं मोरींत बसवून स्नान घालून कोरड्या वस्त्रानें अंग पुसून मग बिछान्यावर निजवून जाड वस्त्राचें पांघरूण घालून एक तासपर्यंत स्वस्थ निजवावें. घाम येईल तो पुसून काढावा. हवा शुद्धिकरितां खोलींत धूप जाळावा. नंतर लघुअन्नाचें भोजन घालावें. व निदान १५ दिवस तरी ऊन पाणीच पिण्यास द्यावें. ज्वरमुक्त झाल्यावर त्याला भूक फार लागूं लागल्यामुळें वरचेवर खाण्यास मागतो. अशा वेळीं लाडू वगैरे जड

पदार्थ न देतां हलके व सहज पचणारे पदार्थ खाण्यास द्यावें. बदामपाक द्यावा, कोहाळेपाक द्यावा, संत्रे डाळिंब वगैरे पथ्यकारक फळें द्यावी, मोकळ्या हवेंत थोडें थोडें फिरण्यास न्यावें. या प्रमाणें पूर्ववत् शक्ति येईपर्यंत करावें. मग यथेच्छ वागावें.

## ५० ज्वरानंतरचे अशक्ततेस.

**उपाय**—१ ज्वर गेल्यावरही १ सप्तक वेखंड व काडेचिराईत यांचा काढा गूळ घालून द्यावा.

२ वेखंडाचा फांट द्यावा त्याची कृति- २ तोळे वेखंड घेऊन अर्ध बोबडें चेंचून पावशेर आधणपाणी घालून ठेवावें. व निवाल्यावर तें पाणी गाळून दरवेळीं २ किंवा २॥ तोळे प्रमाणें दिवसांतून ३ वेळां द्यावें.

३ लघुमालिनीवसंत, मध, पिंपळीचे चूर्ण घालून २|३ गुंजाभार दोनी वेळां द्यावा. म्हणजे कांहीं ज्वरांश शिलक असल्यास जातो. अग्नि प्रदीप्त होतो.

## ५१ गुडघेमोडीज्वर.

**लक्षण**—हा ज्वर ३ दिवसांचा असतो. ताप बराच जोराचा येतो. पण रोगी सहसा दगावत नाहीं. कांहींएक सूचक चिन्ह नसतां एकाएकीं हा ज्वर येतो. व रोगी अगदीं थकून जातो. यांत असमाधान हात, पाय, सळकणें, तहान, डोकें दुखणें, अरुची, हे प्रकार होतात. कांहीं रोगी असें आढळतात कीं, कोणाच्या मुठीच वळतात व मिटतात, कोणाचे सांधेच धरतात, तर कोणाची कंबरच धरते, हा रोग दुष्काळानंतर किंवा भयंकर सांथीच्या रोगानंतर उद्भवण्याचा संभव असतो. गुडघे मोडल्यासारखे होतात व अंगावर विशेषत: पाठीवर किंवा पोटावर किंवा मानेवर व गुडघ्यावर पुरळ उठतो; व तीन दिवसांनीं मावळून कोंड्यासारखा त्वचेचा भाग सोलून जातो. हा पुरळ गोंवरासारखा असतो. ज्वरांत किंचित थंडी वाजते ताप १०३|४ पर्यंत असतो. क्वचित् ५ पर्यंतही असतो. तरी भिण्याचें कांहीं कारण नाहीं. चेहरा लाल दिसतो, व कित्येकास घामही येतो. अन्नावर वासना नसते. हा एक विशिष्ट पण कडकज्वर आहे. स्थित्यंतर व स्थलांतराप्रमाणें फेरफारही होतो.

हा सांसर्गिक ज्वर आहे, व सांथीच्या ज्वरांतलाच आहे. याचें स्थान पूर्वअर्वस्थान चीन, हिंदुस्थानचा कांहीं भाग, दक्षिणेकडील कांहीं बेटें, झांझीबार, व यूरोप व अमेरिकेंतही हा असतो. तरीं तो सर्व ठिकाणीं उष्णकटिबंधांतच असतो; हें विशेष आहे. आणि तो उन्हाळ्यांतच उद्भवतो.

**उपाय**--रोग झाला असतां औषधापेक्षां पथ्यच जास्त संभाळावें. ऊनपाणी द्यावें, स्वस्थता ठेवावी, गवतीचहा द्यावा.

२ कडूलिंबाची साल, मिरें, सुंठ, दालचिनी यांचा काढा द्यावा.

३ ह्यास उत्तम उपाय म्हंटला म्हणजे रोग्याची सुश्रुषा चांगली ठेवावी, स्वच्छ कपडे द्यावे. खरी इच्छा झाल्याशिवाय खाऊं घालूं नये. तापवून निवालेले पाणी पाजावें. ३ दिवसांनीं आपोआप रोगी बरा होतो.

४ थंडीवाजून आल्यास कोयनेल द्यावें डोकें दुखत असल्यास सुंठ किंवा चंदन उगाळून लेप द्यावा.

५ कडूलिंबाच्या सालीचा काढा साखर व गुग्गुळ घालून द्यावा.

६ झोंप येत नसल्यास अफू हुंगवावी किंवा पोटांतही अल्पप्रमाण द्यावें.

७ पुरळास कापूर मिश्रित चंदन किंवा चंदनी अत्तर लावावें.

## इन्फ्लूएंझा ( सांथीचा ताप )

**कारण** --हा ताप दूषी हवेपासून उत्पन्न होतो. दूषी हवेंत प्रथम विषयुक्त अति सूक्ष्म कृमि उत्पन्न

होऊन ते हवेंत झपाट्यानें पसरतात. व त्यांतल्यात्यांत इतर अनुकूल हवेची मदत होते त्यामुळें तर त्या सांथीची वाढ अधिक झपाट्यानें फार लवकर पसरते. मग तर स्वच्छ हवा असेल तेथेंसुद्धां मनुष्याच्या हालचालीमुळें व दळणवळणामुळें व दूषी मनुष्यांच्या श्वासोछ्वासामुळें, य कपड्यांतील दूषी कृमीमुळें, इत्यादि अनेक कारणांनीं प्रवेश होऊन तेथील हवा दूषित होऊन ती सुद्धां बिघडते

शके १८४० साली म्हणजे सन १९१८ सप्टेंबर-पासून दिसेंबर अखेरपर्यंत सर्व पृथ्वीवर पसरली व लाखों माणसें अवघ्या ४ महिन्यांत मेली. फक्त हिंदुस्थानचेच आंकडे पाहिले तरी मृत्यु संख्या ५।६ लक्षावर होती. ह्या वेळीं चांगलीहवा, वाईटहवा, दलदलीचा प्रदेश, किंवा ऊंच डोंगराचा प्रदेश, झाडीचा जंगली प्रदेश, किंवा बिनझाडीचें सपाट मैदान यांतील हवेचा भेदच राहिला नाहीं. गरीब व श्रीमंत मनुष्येही ह्या तडाख्यांत सांपडली. तशीच लहान गलिच्छ घरांतील, झोंपड्यांतील व श्रीमंताच्या स्वच्छ दिवाणखान्यांतील मनुष्यांवरही या दूषी तापाचा पगडा बसला. तरी श्रीमंतापेक्षां गरीबांची मरणाची संख्या फार अधिक होती. याचें कारण याच वेळीं अवर्षण व लढाईमुळें दुष्काळ, व चांगल्या धान्याचा अभाव हें होय. ही सांथ युरोपांतील ४।५ वर्षे चाललें युद्धांतील प्राणहानीमुळें प्रेतांच्या कुजण्यामुळें हवा बिघडून उत्पन्न झाली. व अजारी मनुष्ये मुंबईत आल्यामुळें मुंबईत प्रथम आरंभ होऊन तेथून झपाट्यानें सर्व हिंदुस्थानभर पसरली

ह्या ज्वराचें लक्षण—ह्या तापांत प्रथम थंडी वाजते ( हींव येतें ) अंगमोडून येतें, ताप, अशक्तता, अवष्टंभ किंवा अतिसार, मनाची अस्वस्थता, थोडें डोकें दुखणें, दुसऱ्या अवस्थेंत १०४।५ अंशपर्यंत उष्णता चढणें व इतर उपद्रव बलवत्तर होणें, व वातपित्ताचा जोर अधिक होणें, व खोकला, निद्रानाश. तिसऱ्या अवस्थेंत बाकी सर्व लक्षणें पूर्ण होऊन त्यांत कफाचें प्राबल्य जास्त होऊन त्रिदोषामुळें श्वास जास्त होऊन असाध्य होणें, अशीं लक्षणें होतात. कोणा कोणास कांहीं अधिक लक्षणेंही होतात.

## साध्यासाध्य विचार.

प्रथम अवस्थेंत रोगी असतां योग्य उपाय झाल्यास साध्य होतो. दुसरी अवस्था कष्ट साध्य. तिसरींत बहुत यत्नानें व रोग्याच्या नशीबानें उत्तम उपाय झाल्यास जगतो. तसें न झाल्यास जगण्याची आशा नाहीं.

उपाय––१कडूनिंबाची साल ( बाळंत निंब ) १ तोळा, रिंगणीमूळ ॥- तोळा, काडेचिराईत, सुंठ, मिरें, बडीशेप, ओंवा, पित्तपापडा, वावडिंग हीं प्रत्येकीं पावपाव तोळा, एकुण नऊ जिन्नस घेऊन साधारण चेंचून ८० तोळे पाणी घालून अष्टमांश काढा करून १० तोळे उरला म्हणजे गाळून कुप्पींत भरून ठेवावा. काढा उतरतेवेळीं शेवटल्या कढाच्या आधीं १ तोळा गूळ घालावा. व एक कढ झाल्यावर उतरावा. दिवसांतून ४ वेळां प्रहरा प्रहरानें द्यावा. दरवेळीं २॥ तोळे प्रमाण थोराचें ठेवावें. लहानास ५ वर्षांपर्यंत १ तोळा. ५ ते १२ वर्षांपर्यंत १॥ तोळा पुढें १६ वर्षांपर्यंत २ तोळे प्रत्येकवेळीं द्यावा. दि० ७ हें औषध प्रथमपासूनच सुरू ठेवल्यास कफ वगैरे घातक प्रकार होतच नाहींत. हें ह्या तापास रामबाण औषध आहे. यानें पुष्कळ रोगी बरे झाले आहेत. हें मी स्वतः अनुभविलेलें माझेंच औषध आहे.

२ राजचंद्रेश्वर मात्रा आल्याचा रस व मध किंवा खडीसाखर यांतून द्यावी. कफावर व अंगांतील ज्वरावर याचा उपयोग चांगला होतो.

३ पुष्कळ डॉक्टर या व मलेरिया व दुसऱ्या सांथीच्या तापावर क्विनाईन देतात. पण त्याचें अंगीं तापाचा रोध करण्याचा तेवढा गुण आहे. पण त्यांत दोष आहेत ते––बहिरेपणा येणें, कानांत आवाज होणें, शिरोवेदना, पित्त होणें, दृष्टिमांद्य, निद्रानाश

वगैरे विकार होतात. हे विकार न होतांही उत्तम निखालस ताप जाण्यास कडूनिंब ही दिव्य औषधि आहे. २ शेर पाण्यांत १ शेर कडूनिंबाची साल चेंचून घालून चतुर्थांश काढा करून गाळून ठेऊन रोज २।३ वेळां १०।१० मिऱ्याची पूड घालून द्यावा प्रमाण ३।३ तोळे. हटकून गूण येतो.

४ शुद्ध बचनाग २ भाग, रससिंधूर २ भाग, करंजबीज ६ भाग, गुळवेलसत्व १ भाग, सर्व लिंबू-रसांत खलून २ गुंजाभार वजनाच्या गोळ्या करून थंडीवाजून येणेपूर्वी ६ तास असतां १ गोळी मधांतून द्यावी. विषमज्वर व सांथीचेज्वर जातात.

५ कडूवृंदावनाचें फळ ठेंचून वस्त्रांत घालून गाळून रस काढावा त्यांतील २।२ थेंब दिवसांतून दोन वेळ १।१ तोळा पाण्यांतून द्यावें. कफाचा जोर कमी होऊन, पूर्वी झालेला कफ सुटून जातो. हें एकच औषध ४।५ दिवस केल्यास कफाचा नाश होतो. हें विषारी आहे, सबब २ थेंबापेक्षां जास्त देऊं नये.

## ५३ प्लेग

### ग्रांथिक सन्निपात. ( उर्दूत ताऊन. )

या भयंकर रोगानें आजपर्यंत मनुष्यांची अत्यंत प्राणहानी केली आहे. सन १८९६ पासून आज-पर्यंत जवळ जवळ १ कोट लोक ह्या प्लेगज्वरानें प्राणास मुकले आहेत. तरी यावर वस्ताद औषध निघाले नाहीं. असा हा रोग आहे तरी काय ? याजबद्दल ऐतिहासिक माहिती सांगून नंतर चिकित्सा सांगितली आहे.

### प्लेगाची ऐतिहासिक माहिती.

मुसलमान इतिहासकर्त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, हिंदुस्थानांत इसवी सन ९०७ मध्यें शिकंदर लोदीच्या कारकीर्दीत "हेगीरा" येथील सांथ येऊन गेल्यावर ९५५ मध्यें पुन: तेथेंच आली. १६१५ चे सुमारास जहांगीरच्या कारकीर्दीत पंजाबमध्यें सात सुरू होऊन ती लाहोर आणि दिल्लीपर्यंत पसरली होती; व तीपासून पुष्कळ शहरें व गांवें उध्वस्त झालीं. त्याचें कारण इतिहास कर्त्यांनीं दोन वर्षें पाऊस नसल्यामुळें व हवा बिघडल्यामुळें ही सांथ आली असें ठरविलें होतें. चौथी सांथ महंमद तखलख याच्या सैन्यांत सन १३२५ पासून १३५१ पर्यंत अनेक वेळां सुरू झाली. ह्या शतकाच्या शेवटीं तैमुर्लंगाच्या सैन्यांत सांथ झाली होती. सन १४४३ सालीं माळव्यांत झाली. त्यावेळीं सुलतान महंमदखान ( पहिला ) याचे घोडेस्वार फार मेले. मुतामदखान याच्या वर्णनावरून असें कळतें कीं, सन १६१९ मध्यें पुनः प्लेग झाला. तो आतांच्या सारखाच असून अस्सल होता. पुनः सन १६८९ मध्यें विजापूर येथें औरंगजेबच्या छावणींत प्लेग उद्भवून एक लक्ष लोक मेले. त्या वेळीं हा आजार ३ महिनें चालू होता. आणि पुढें ३ वर्षें साधारण चालू होता. ह्या आजारानें विजापूर शहर अगदीं उध्वस्त झालें. विजापूर प्रांत तर त्या वेळीं अगदीं ओस पडला होता. सांथ संपल्यावर खानेसुमारी ( मनुष्य गणती ) केली. तेव्हां २० लक्ष लोकसंख्येपैकीं निमी म्हणजे १० लक्ष लोकसंख्या राहिली. आणि ९ नऊ लक्ष घरांपैकीं १८००० अठरा हजार घरें शिल्लक राहिलीं. ( विजापूर गॅझेट पान ४३७ ) या नंतर उत्तर हिंदुस्थानांत पहिली सांथ कच्छमध्यें १८१५ त सुरू होऊन १८२१ पर्यंत गुजराथ व सिंध येथें होती. हिंदुस्थानांत हिमालयाचे नैऋत्येस कुमाऊन, गरवाल इत्यादि ठिकाणीं १८२३ पासून १८४४ पर्यंत मधून मधून सांथ होतीच. नंतर सन १८२८ मध्यें दिल्ली प्रांतांत सुरू होऊन पसरत पसरत रोहिलखंड, राजपुताना, जोधपूर मेवाड इत्यादि ठिकाणीं पसरली. १८४८ च्या पुढें मात्र १८९६ पर्यंत हिंदुस्थानांत कोठेंच प्लेगाची सांथ नव्हती. परंतु हांगकांगहून (चीन) १८९६ सालीं प्लेगचे ठाणें मुंबईस आलें तेव्हांपासून आज १९२० पर्यंत जवळ

जवळ १ कोटीची भरती झाली असेल. अजूनही तुरळक तुरळक सांथ आहेच. ही सांथ सर्व हिंदुस्थानभर होती.

जेव्हां १६८९ मध्यें औरंगजेब विजापुरास आला होता त्यावेळीं औरंगजेबच्या पदरचा हकीम महंमदअजीनी हा औरंगजेबाबरोबर दक्षिणेंत आला होता त्यानें आपल्या 'तिब्बे अखबरींत' लिहून ठेविली आहे कीं उर्दूमध्यें प्लेगला "ताऊन" म्हणतात, ह्यांत येणारी गांठ "फुनशी" कधीं वाटाण्या येवढी लहान तर कधीं अक्रोडा येवढी मोठी असते, कधीं त्याहूनही मोठी असते. गांठींत आग फार असते, गांठी भोंवताली निरनिराळे रंग आढळतात. पण काळ्या रंगाची गांठ फार भयंकर असते. जेव्हां गांठीचा रंग पिंवळा किंवा लाल असतो; तेव्हां उलटी फार होते. व तो भ्रमिष्ट व बेहोष होतो. गांठी खाकेंत, गळ्यावर, जिभेच्या बुडाशीं, कानाच्या मागें, जांघेमध्यें इत्यादि कोठें तरी होतात. कानाच्या मागील गांठ फार भयंकर होय. कारण ती मन व मेंदू याचे जवळ असते. ( सन्निपात ज्वरांत यास कर्णमूळ म्हणतात ). ज्या दिवसांत पटकी येते त्याच दिवसांत प्लेगही येतो. प्लेगचा रोगी घाबरा होतो व त्याची छाती धडधडते. ( हृदय उडतें ). सबब प्रथम त्यावरच उपचार करावे. थंड सुगंधी दारु, डाळिंबाचें सरबत, सफरचंदाचें सरबत, महाळुंग, नारिंग, वनफशा, लिंबू इत्यादिपैकीं समयास जें मिळेल त्याचें सरबत करून पोटांत द्यावें. छातीवर चंदन, कापूर इत्यादि सुगंध द्रव्याचा लेप करावा. घरांत दुर्गंधी नाशक द्रव्यांचा धूप जाळावा. व रोग्यास सुगंधी द्रव्यें हुंगण्यास द्यावीं. रोगी राहण्याच्या जागा थंड व शांत अशा असाव्या. गांठीवर प्रत्यक्ष उपचार न करितां, तिच्या भोंवतालीं करावें. म्हणजे गांठींतील दुष्ट रक्त दुसरे जागीं पसरत नाहीं. गांठीवर जळवा लावून दुष्ट रक्त जाईल तितकें जाऊं द्यावें. तुंबडीनेंहीं काढावें. रोग्यास थंड पदार्थ खाऊं घालावे. हलके अन्न, मांसरस, दूध, हे पदार्थ धर्माचाराप्रमाणें खाऊं घालावेत. विशेष प्रसंगीं शीर तोडून रक्त काढावें. गांठीचें दूषित रक्त बाहेर गेल्यावर रोगी जगतो. प्लेगची गांठ चिरणें झाल्यास सवंध चिरावी. कापण्याच्या आधी चांगला विचार करून काम करावें. नासलेले रक्त दुसऱ्या जागीं लागू देऊं नये. रक्त जात आहे तोंपर्यंत रोग्यास सुवासिक थंडपाणी पाजावें. गांठ मोठी असेल तरच चिरावी किंवा जळवा लावाव्या. लहान गांठ नुसतीच राहूं द्यावी. व जळवा लावाव्या. सारांश गांठीच्या सभोंवतालचा रंग ओळखून विषाच्या जोरानुसार तजवीज ठेवावी. गांठ चिरण्याच्या अगोदर किंवा मागाहून रोगी बेशुद्ध होतो कारण रोगांत मेंदू व हृदय हीं अशक्त होतात, सबब शक्ती कायम राहील असें उत्तेजक पेय द्यावें. ( वर बहुतेक शीतोपचार करणेस सांगितले आहेत, आणि इतर ज्वरी रोग्यास शीतोपचार त्याज्य आहेत खरे पण तो नियम येथें लागू नाहीं. कारण इतर ज्वराहून हा प्लेगज्वर निराळा आहे. हा विषकीटकजन्य आहे. विषास शीतोपचारच इष्ट आहेत. उष्णोपचारानें विषारीज्वर वाढतो सबब शीतोपचारच करावे. पण त्यांतही तारतम्य ठेऊन वैद्यानें यशस्वी व्हावें. )

आर्य वैद्यकापेक्षां युनानी वैद्यकांतचे प्लेगासंबंधी माहिती विशेष मिळते. कारण हा रोग आपलेकडे आरेबिया, आफ्रिका इकडून आला आहे. प्राचीन काळीं जर हा रोग इकडे असता तर ज्या प्राचीन वैद्यांनीं आपल्या शोधांच्या प्रभावानें हल्लींच्या मोठमोठ्या शोधकांसही थक्क करून सोडलें आहे, त्यांच्या सपाट्यांतून प्लेग टिकून राहिला नसता हें उघड आहे. असो ह्या रोगाच्या ज्ञानाबद्दल आरबी ग्रंथकार नाफझ ह्यांच्या "शहराआशबाब" ह्या पुस्तकांतूनही "ताऊन" हेंच नांव प्लेगास दिलें आहे. उपायही दिले आहेत ते पुढें योग्य स्थळीं घेतले आहेत. पुरुषांपेक्षां स्त्रियांचीं संख्या मरण्यांत जास्त आढळते. गरोदर स्त्रीस प्लेग झाल्यास जगणें कठीण

## प्लेगजंतु वर्णन.

प्लेगाचे जंतु आंखूड, निमगोल आकाराचे असून त्यांचीं टोकें वाटोळीं असतात, अथवा चौ स असतात. ते एकएकटे किंवा जोडीनें एकमेकास चिकटलेले असे असतात. किंवा सांखळीसारखे एकत्रही जुळलेले आढळतात केव्हां केव्हां त्या जंतू भोंवतीं आच्छादनही आढळतें. त्यास चलनशक्ती मुळींच नसते. हे रक्ताशीं मिळतांच, त्यांची वाढ जलद होऊन रक्त दूषित होतें ते जंतु प्लेगच्या गांठींत विपुल सांपडतात. ज्याच्या अंगांत प्लेगजंतु पोसण्याजोगी रक्ताची स्थिति झाली असेल, त्यासच प्लेग बाधतो. इतरांस त्याची बाधा होत नाहीं किंवा तो लागू झाला असूनही जगतो. कारण शरीरांत विषारी सूक्ष्म जंतूंचा नाश करण्याची शक्ति आहे; म्हणूनच प्लेगासारख्या भयंकर सांथीतून व प्लेगांतून हजारों लोक निर्भय जगतात. ही शक्ति कोठ्यांतील रसांत व दुसऱ्या पाचक रसांत आहे. पण त्याहीपेक्षां जोराची शक्ति रक्तांतील गोलकांत आहे परंतु गोलकांपेक्षां जंतूंचा जोर अथवा जमाव अधिक असतो तेव्हां गोलकांचें कांहीं चालत नाहीं. यामुळें ते जंतु आपला अंमल अधिक करून रोग उत्पन्न करितात. परंतु जों पर्यंत शरीराचा जोम चांगला आहे, रक्त व त्यांतील गोलक निकोप आहेत व जोमदार आहेत, तोपर्यंत प्लेग किंवा कोणत्याही सांथीच्या तापाचें बाधणें शक्य नाहीं. अर्थात् सांथीच्या दिवसांत प्रत्येक माणसानें प्रकृती निकोप व चांगली सशक्त राखणें–विषयीं प्रथमपासूनच जगावें.

## उंदरांचा प्लेगाशीं संबंध.

कृमिजन्य विषापासून रक्त दूषीत होऊन हा ज्वर येतो. हें सर्व विद्वान वैद्य व डाक्टर यांच्या अनुभवानें ठरलें आहे. जशा हींवताप, गोंवर, देवी वगैरेच्या सांथी येतात तशीच याचीही सांथ येते. यांत प्रथम दूषित हवेंत कृमि उत्पन्न होऊन उंदरांची कातडी पातळ असल्यामुळें त्यांच्या कातडीस दंश करितांच त्यास त्या विषजंतूचें विष बाधून उंदरांस ज्वर येऊन व गांठ येऊन उंदीर मरतात. हे उंदीर अनेक प्रकारचे आहेत. ते असे—(सुश्रुत मूषिका कल्पाध्याय पहा) १ लालन, २ पुत्रक, ३ कृष्ण, ४ हंसीर, ५ चिक्किर, ६ छुछुंदर (छिछुंदरी) ७ अलस ८ कषायदशन, ९ कुलिंग, १० अजित, ११ चपल, १२ कपिल, १३ कोकिल, १४ अरुणसंज्ञ (तांबडा उंदीर) १५ महाकृष्ण (घूस) १६ श्वेतमूषक, (पांढरा उंदीर) १७ कपोताभ, (कपोताच्या रंगाचा) असे प्रकार आहेत. या प्रत्येकाची हीनाधिक विष लक्षणेंही आहेत. वाघाचें विष नखांत असतें, सर्पाचें दातांत असतें, विंचवाचें नांगींत असतें, गोम वगैरे कीटकांचीं विषें स्पर्शांत असतात. त्याप्रमाणेंच उंदराचें विष शुक्रांत असतें; अथवा वीर्यद्वारें प्रकट होतें. म्हणजे ज्याच्या शरीरावर त्यांचें वीर्य पडतें, अथवा वीर्यानें भरलेल्या आपल्या नखदंतांनीं मानवी प्राण्यांच्या ज्या भागावर स्पर्श करितात त्या त्या भागाच्या शरीरांतील रक्त दूषित करितात, व त्यामुळें गांठीचे रोग सूज, कल्पका सारखीं मंडळें, भयंकर पुटकुळ्या, भयंकर अशे अग्नि विसर्पादि रोग, सांधे दुखणें, तीव्र पीडा, भयंकर ज्वर, मूर्छा इत्यादि उत्पन्न होतात. मूषक विष वर्षाकालीं कोप पावते. आपणांस अनुभव आहे कीं अभ्र आलें असतां प्लेगाचा जोर होतो. दूषी विषाचाही हाच प्रकोप काल आहे. प्लेग होण्या पूर्वी सार्वत्रिक मूषकांची वाढ उत्पन्न होते. व ते एकमेकांच्या अंगावर स्वैर गतीनें धांवत सुटतात. म्हणजे त्या संधीस त्यांची वीर्यवृद्धि जास्त झाल्यामुळें ते फार उन्मत्त होतात, व विप्रयलोलुप होतात व तशांतच ते शुक्रगतरोग (ज्वर) येऊन मरण पावतात. व तेंच विष वायु, कृमि, धान्यादिक व संसर्ग, इत्यादिकांनीं सर्व देशभर पसरतें; व अनर्थास कारणीभूत होतें. हा ज्वर मूषकांना नैसर्गिक आहे. तसेंच हा विषसंभूत असल्यामुळें आशुकारी (शीघ्रमारक) आहे, हें प्रसिद्धच

आहे. नैसर्गीक असल्यामुळें अपरिहार्य आहे. पूर्वी मूषिका संहार याच तत्वावर चालू असेल; पूर्वी सांगितलेले मूषकांचे प्रकारांचे विषवेग न्यूनाधिक असल्यामुळें त्याची बाधा शरीरावर न्यूनाधिक होते. पहिल्या प्लेगापासून कृष्णमूषक बहुत करून पहाण्यांत येत नाहींत. हे फार वीर्यवान म्हणून प्रखर विषारी असतात. हेंहीं खरें आहे. दिवसेदिवस प्लेगाचा जोर कमी होण्याचें कारण विषारी हवेवरच अवलंबून आहे. प्रखर विषमूषक यांचीं अथवा प्राणहर विष-मूषक लक्षणें हीं " जनपदव्यापत्चिकित्सेंत " दाखविली आहेत. मूषक जाती ही परमेश्वर निर्मित असल्यामुळें ती सर्वांशी नष्ट करणें हें कठीणच आहे. उंदराची वाढ फार जलद होते. उंदरीण दरसाल ६ खेपा विते. व दर खेपेस ८।१० पिलें होतात, तीं ६ महिन्याचीं झालीं कीं त्यांस पोरे व्हावयास लागतात. अशा या भूमिति श्रेढीच्या मानानें वाढणाऱ्या ईश्वर निर्मित वाढीस मनुष्यांच्या उद्योगानें संहार होणें अशक्य आहे. तरी औषधी योजना शोधून काढणें विद्वानांचें काम आहे.

माणसाच्या अंगांत हें विष पिसवांच्या द्वारें जसें पसरतें तसेंच तें एका उंदरापासून दुसऱ्या उंदरासही पिसवांच्या द्वारें प्रवेश करितें. व त्यांच्या अंगावरील पिसवा तें उंदराचें जंतुजन्य विषयुक्त रक्त खाऊन संचार करित असतां मनुष्यांस दंश केल्यानें मनुष्याचें रक्त दूषित होऊन मनुष्यांस ज्वर येतो. ( डॉ. लोक टोंचून सीरम रक्तांत मिसळतात तसेंच हें होते )

पिसवा २ प्रकारच्या आहेत दोनही जाती अति सूक्ष्म जंतूवर व जनावरें, पक्षी व मनुष्य यांच्या रक्तावर पोसणाऱ्या आहेत; परंतु त्यांत एक जात तर रक्तांत रोगबीज पसरविणारी व दुसरी रक्तावर फक्त निर्वाह करणारी आहे. ह्यांतही पुष्कळशा जंगली जनावरांवर व पक्षी जातींवर सांपडतात. प्राणिशास्त्र वेत्त्यांनीं पिसू ही कीटक वर्गांत गणिली आहे. व तिचे ९ उपवर्ग केले आहेत. त्यापैकीं द्विपक्ष या उपवर्गांत रोगबीज पसरविणारी पिसू येते. ही अंडज असून हिच्या फुलपाखरांप्रमाणें ४ अवस्था होतात. पहिली अवस्था आंडी असून दुसरी सुतासारखी बारीक आळी, तिसरी कोसा, चवथी तपकिरी रंगाची उड्या मारणारी चापट पिसू. पिसवांची वाढ ओलसर, दमट, घाणेरड्या जागेंत, केरकचऱ्यांत फार जलद होते व उष्ण हवेंत व उष्ण ऋतूंत खुंटते व राहिलेली नाश पावते.

पिसूं रक्त पिणारी असल्यामुळें ती आपली विष युक्त सोंड मनुष्यांच्या रक्तांत खोऊन रक्त पिऊं लागली म्हणजे सहजच रक्तांत विष मिसळलें जातें. रक्तांत विष मिसळतांच तें विष सूक्ष्म जंतुयुक्त असल्यामुळें त्या सूक्ष्म जंतूंची वाढ मनुष्यांच्या रक्तांत फार जलद होते. व सर्व रक्त दूषित झाल्यामुळें जोराचा ताप येऊन सन्निपाताचीं सर्व लक्षणें पूर्ण होऊन मनुष्य मरतो. कमी प्रमाणाचें किंवा कमी दोषाचें विष एकाद्यास विशेष न बाधल्यामुळें क्वचित् रोगी जगतात. पण असे जगणारे फार थोडे. विषदूषित रक्ताचा अतिरेक झाला म्हणजे त्यापासून गांठ उठते ती अशी कीं, पिसु कमरेखालीं कोठेंही चावल्यास जांगाड्यांत गांठ उठते. कमरेपासून मानेपर्यंत कोठेंही चावल्यास खाकेंत गांठ उठते. व मानेवर कोठेंही डोक्यापर्यंत चावल्यास मानेवर किंवा कानाच्या मागें कर्णमूळाच्या जागीं गांठ उठते. असे आहे तरी केव्हां केव्हां हातास किंवा पायास मध्येंच गांठ उठलेली आढळते. याचें कारण मध्येंच कोठें तरी रक्त वाहीनीस पिसू चावली असतां व पुढें जाणाऱ्या रक्त वाहिनींतील विषजंतूंचा रोध झाल्यामुळें मध्येंच गांठ उठते, हें असावें. तान्ह्या मुलांस प्लेग झालेला अगदीं क्वचित आढळतो.

## स्थानत्याग आणि जपणें.

मूयंते मूषका यत्र निवसेत्तत्र नक्षणं ॥

नृसिंह पुराण ॥

वरील कारणावरून उघड दिसतें कीं, उंदीर अधिक वाढून मरूं लागले म्हणजे ती जागा तत्काळ

सोडून लांब हवाशीर जागेंत जाऊन रहावें. प्लेगाचे वेळीं स्थानत्याग करणारांनीं ध्यानांत ठेवण्या सारख्या गोष्टी —

१ स्थानत्याग करितांना उंदरांचा उपसर्ग न होईल अशी खबरदारी घ्यावी.

२ उंदीर मेलेलें ठिकाण दूषित समजून ताबडतोब सोडावें.

३ उंदरांच्या अंगावरील पिसवा रोगप्रसारक व रोग वाहक समजून त्यांपासून उपसर्ग न होईल असें करावें.

४ पिसवा आणि प्लेग जंतु हीं उष्णतेनें मरतात, सबब चिरगुट पांघुरणे वगैरे रोज उन्हांत ठेवावीं अथवा शेकून काढावीं.

५ दूषित ठिकाणांशीं संबंध ठेऊं नये व रात्रीं तेथें निजूं नयेच पण क्षणभरही राहूं नये.

६ बाहेर राहिल्यावर पुन्हां वरचेवर घरीं जाऊं नये व वहिवाटूं नये.

७ दूषित ठिकाणीं राहिलेल्या मनुष्यांस आपल्या शेजारीं घेऊं नये व त्यांच्याशीं होईल तितका संबंध टाळावा.

८ घरांत उंदीर पडूं लागतांच पुढें लिहिल्या पैकीं कोणताही धूप जाळावा.

९ रिठ्याच्या किंवा खाऱ्या साबणाच्या किंवा रसकापूर घातलेल्या किंवा मोरचूद घातलेल्या पाण्यांत कपडे धुवावें किंवा साध्या पाण्यांत कपडे २ कढ येईपर्यंत उकळून मग स्वच्छ धुऊन उन्हांत वाळवावें

१० पाणी एक कढ आणून तांब्याच्या भांड्यांत ठेऊन निववून प्यावें.

११ सांथीच्या दिवसांत अजीर्ण होईल असें अन्न खाऊं नये व ज्या कारणांनीं इतर ज्वर येतात तीं कारणें वर्ज करावीं.

## हवा शुद्ध करणार धूप.

प्लेग चालू असतां घरांत उंदीर पडोत वा न पडोत रोज सकाळ संध्याकाळ धूप जाळावयाचा तो—

१ कडू लिंबाचा पाला वाळवून तो घरांत जाळावा.

२ गुग्गूळ, राळ, चंदन, लोबान ( ऊद ) यास तुपाचा वास लावून जाळावा.

३ गंधक किंवा चंद्रज्योती पेटवून दारें खिडक्या लावून धूर कोंडू द्यावा.

४ कडू निंब, राळ, गूळ, पांढऱ्या मोहऱ्या, गुग्गुळ, चंदन ह्यांचा धूप द्यावा.

५ ज्वरांत व विषमज्वरांत कित्येक धूप सांगितले आहेत, त्यांचाही उपयोग करावा.

६ ज्यांस स्थानत्याग अनेक अडचणीमुळें किंवा गरीबीमुळें करवत नाहीं त्यांनीं सदरी धूप जाळून घरीं रहावें. पण गांवांत दुसऱ्या घरीं मात्र जाऊं नये.

**प्लेग ज्वराचीं लक्षणें** — सन्निपात ज्वराप्रमाणेंच नाडीची गती अस्थीर व जलद असते. ताप १०२ पासून १०५ किंवा त्याहून जास्तही असतो, मन व वृत्ति चंचल असते, चैन पडत नाहीं, वांत्या किंवा जुलाब होतात. पण कोणास होतही नाहींत. चेहरा निस्तेज व काळवंडतो, त्रिदोष होण्याकडे विशेष भर असतो, बडबडतो, वरचेवर उठण्याचा प्रयत्न करितो. कोणी गुंगीतच असतो. डोळे लाल होतात, डोके दुखतें, असे कोणास कांहीं कोणास कांहीं कमी अधिक उपद्रव होतात, जीभ बुरसट, पांढरी किंवा लाल किंवा पुरळ आलेली असते. ओंठ काळसर होतात, बोटें व नखें काळसर होतात. ह्या तापांत शक्ति पात फार लवकर होतो, करितां रोग्यास बिलकूल हलूं देऊं नये थोड्या हलण्यानेंही थकवा येतो. शक्तिपात न होईल असे उपाय करावे. याला ग्रांथिक सन्निपात अथवा औपसर्गिक सन्निपात असेंही म्हणतात. याची बहुतेक लक्षणें रुग्णेत्र सन्निपाताशीं जुळतात. ज्वर सतत राहतो, घाम येत नाहीं, झोंप येत नाहीं, बेशुद्ध किंवा अर्धवट शुद्धींत असतो. हीं सगळींच लक्षणें ज्यास होतात तो जगणें कठीण

ह्यांत लवकर शक्तिपात होण्याचें कारण रुधिराभिसरणाच्या योगानें हें कीटकजन्य विष हृदयांत जाऊन पोचतें. व हृदय अत्यंत क्षीण होतें. इतर ठिकाणच्या गांठीपेक्षां खाकेंतील व कानाजवळच्या गांठी अधिक घातक असतात.

## विशेष माहिती व लक्षणें

प्लेगाच्या मुख्य ४ जाती आहेत. १ ग्रंथी असणारी (ह्याच जातीचे पुष्कळ रोगी असतात.) २ ग्रंथी रहित (हींत रोगी लवकर बेशुद्ध होऊन सहसा जगत नाहींत.) ३ फुप्फुस दाह असणारी. ४ आंतड्याचा विकार म्हणजे अमांश अगर हगवण असलेली (ह्या जातीचे रोगी क्वचितच दृष्टीस पडतात) गांठी कित्येकांस उठतात, कित्येकांस उठत नाहींत. पण जीभ मात्र प्लेगच्या रोग्याची पांढरी असते. कांहीं रोग असे आहेत कीं, त्या रोगाचे जंतु त्या रोग्याच्या शरीरा बाहेरच जमिनींत अगर पाण्यांत उत्पन्न होऊन वाढतात व कपड्या बरोबर अगर कोणत्याही जड अगर सजीव अशा जंगम पदार्थांबरोबर स्थलांतर करितात. आणि ते नवें स्थळ जर त्यास मानवेल तर अगर मानण्या योग्य असलें म्हणजे मग काय विचारावें ? तेथें ते यथेच्छ पसरतात. आणि एकदां कां असा प्रसार झाला म्हणजे मग कोणत्याही मानवी उपायानें त्याचा बिमोड होणें शक्य नाहीं. सृष्टींत असे कांहीं चमत्कारिक रोग आहेत कीं, ते बंद करणें आपले स्वाधीन नाहीं. तरी देवीची लस टोंचून देवी, व कुत्र्याच्या दंशावर लस टोंचून कुत्र्याचे विषापासून वांचविणें पाश्चूर पद्धतीनें शक्य करून दाखविलें आहे, तर त्याच प्रमाणें प्लेगची लस टोंचून प्लेगाचेंही विष कमी करणें शक्य आहे. पण सांथ उत्पन्न होणेचें बंद करणें मात्र अशक्य आहे. प्लेगास सर्वच ऋतु व सर्वच तऱ्हेची हवा मानवते. आणि तो आपोआपच जातो. तसेंच टोळ, उंदीर इत्यादि आणखी अनेक तऱ्हेचे जीव उत्पन्न झाले म्हणजे मानवी खटपट व्यर्थ जाते. पण ईश्वरी कृपेनें त्यास प्रतिकूल स्थिती मिळाली म्हणजे तत्काळ नाश पावतात. तरी मानवी प्राण्यांनीं उपाय करून पाहुं नये असें मात्र नाहीं. उपाय योजणें हें तर मनुष्याचें कर्तव्यच आहे.

प्लेग, एन्फ्लूएंझा, मलेरिया, दुर्जल जनितज्वर वगैरे या सर्वांवर वस्ताद असें औषध कडू निंबाचेंच होय.

## कडूनिंबाचीं नांवें.

संस्कृत ( निंब, पारिभद्र, कल्पवृक्ष, अमृततरू, ) मराठी ( कडूनिंब, बाळंत लिंब, लिंब, पाडव्याचा लिंब, बाळलिंब, ) गुजराथी ( लिंबडा ) हिंदुस्थानी ( निंब, नींब, ) कानडी ( बेंऊ, बाणंति बेंऊ, बेंत्रिनम, ) तेलंगी ( पेआकु ) इंग्लिश ( Margosa Tree )

## गुणधर्म.

निंब वृक्षाच्या गुणांचे मूळ संस्कृत श्लोक पहावयाचे असल्यास राजनिघंट, मदनपाल निघंट, निघंट रत्नाकर यांत पहावे.

निंबपंचक म्हणजे निंब वृक्षाचे पंचांग–पित्त, रक्तदोष, कंडू, दाह, कुष्ट, व्रण यांचें नाशक आहे. साल व मुळाची साल शीतळ, कडू, लघू, ग्राहक तिखट, अग्निमांद्यकर, सुजेला पिकवणारी, व्रणशोधक लहान मुलास हितकर, अहृद्य, अशी आहे. आणि कृमी, कफ, व्रण, वांती, सूज, विष, पित्त, हृदय दाह, वायु, कुष्ट, श्रम, तृषा, कास, ज्वर, अरुचि, मेह, रक्तदोष, यांचे नाशक आहे. **कोंवळींपानें**–ग्राहक, वातजनक असून रक्तपित्त, कुष्ट, नेत्र रोग यांचा नाश करितात. **जूनपानें**–मुख्यत्वेंकरून व्रण नाशक आहेत. **पानांच्या काड्या**– कास, श्वास, गुल्म, अर्श, कृमि, मेह यांचा नाश करितात. **हिरवीं फळें**–भेदक, स्निग्ध, उष्ण, लघु असून मेह, कुष्ट, यांचे नाशक आहेत. **पिकलीं फळें**–मधूर, कडू, स्निग्ध, गुरु, पित्तल, असून नेत्र रोग, कफ रोग, क्षतक्षय, रक्तपित्त यांचा नाश

करितात बीज मज्जा म्हणजे बियांतला गीर–कृमि, कुष्ट यांचा नाशक आहे.

याप्रमाणें निंब वृक्षाचे गुण असून ह्याच्या पंचांगांचा किंवा कांहीं अंगाचा बहुतेक सर्व दूषित ज्वरांस निरनिराळ्या तऱ्हेनें उपयोग होतो. आणि इतरही अनेक रोगांवर कसा उपयोग होतो, त्याचीही त्या त्या रोगाच्या चिकित्सेंत योजना केली आहे. एकंदरीत वर लिहिल्या प्रमाणें ह्यास कल्पवृक्षाची उपमा आर्य चिकित्सकांनीं दिली आहे ती योग्य आहे. मी याचा प्लेगांत व इतर दूषी ज्वरांत व इतर रोगांत उपयोग करून यश मिळविलें आहे. करितां सर्व आर्य वैद्य, डॉक्टर व हकीम यांनीं आवश्य उपयोग करून पहावा, अशी विनंति आहे. ह्या उपायानें प्लेगाची लस टोंचणें, उंदीर मारीत सुटणें व इतर भानगडीचें कारणच पडणार नाहीं.

## साध्यासाध्य विचार.

प्लेगचा आजार ह्मणजे मृत्यूचें आमंत्रणच होय हें जरी खरें आहे, तरी शेंकडा २५।३० पर्यंतही जगलेले आहेत. प्लेगचें विष सांथीच्या दिवसांत जसें तीव्र असतें तसें तें पुढें रहात नाहीं. पुष्कळ अंशीं कमी पडतें. मग सांथही मंदावते; व रोगीही कांहीं कांहीं जगूं लागतात. ज्याची गांठ जलद वाढून फुटते तो बहुशः जगतो. गांठ लहान असलेला व गांठ मुळींच नसलेला ( न उठलेला ) लवकर मरतो. प्लेगांत फुप्फुस दाह झाल्यास जगतच नाहीं. इतर ठिकाणच्या गांठींपेक्षां जांगाड्यातल्या गांठीचे रोगी जास्त जगतात. गांठ उठलेला व जितकी मोठी होईल तो जगण्याचें कारण असें कीं, प्लेगचे जंतू गांठींत जमून येतात. यामुळें त्यावर उपाय झाला ह्मणजे त्यांचा नाश होतो. व अंगांतील विष कमी होतें आणि असेंही होतें कीं ग्रंथींत जो पू होतो त्यांत जे पुवाचे जंतु असतात ते प्लेगच्या जंतूंना खाऊन टाकतात. अर्थात ग्रंथींतून जो पू निघतो त्यांत प्लेगचे जंतु आढळत नाहींत. ह्मणून ग्रंथी येऊन पिकणें हें लक्षण चांगलें होय. आणि ग्रंथी न आलेलेच अधिक मरतात, असा अनुभवही येतो.

## उपाय.

१ प्लेगांत शीर तोडून केव्हाही रक्त काढूं नये. ( शीर तोडून रक्त काढावें असें मागें एके ठिकाणीं लिहिलें आहे. पण शक्तिपात होणेचें लक्षण असल्यास व रोगी अशक्त असल्यास रक्त काढूं नये. ) थंड व हृदयाची शक्ति राखणारे उपाय करावे. चंदन, कापूर, निलोफार ( युनानी ) इत्यादि गुलाब पाण्यांतून गांठींवर लावावी. थंड सरबतें द्यावीं. साखरे मध्यें घालून टिकविलेलें मांस, मांस रस, व मसूर, वाटाणा, कोंबडीचा सुरवा, सिरका घालून द्यावा. गांठींत पू होतांच तो चिरून बाहेर काढावा. व वर शेकाचा मारा करावा. ( युनानी हकीम )

२ कडूनिंबाची साल ५ तोळे घेऊन कुटून त्यांत ८० तोळे पाणी घालून त्यांत ३ मासे मिरपूड ओंवा किंवा खुरासनी ओंवा पाव तोळा घालून अष्टमांश काढा करावा. व गाळून काच कुपींत ठेऊन त्यांत २ गुंजा भार काळ्या बोळाची पूड घालून हलवून कुपी ठेवावी दर खेपेस २ तोळे काढा २ किंवा २॥ तासांच्या फेरानें ५ वेळ पाजावा. लहान मुलांस वयमान पाहून अर्धा किंवा एक तोळा द्यावा. हटकून गुण येतो दि. ३।५

३ कडूनिंबाच्या सालीच्या काढ्यांतून किंवा पाल्याच्या रसांतून १ गुंज प्रमाण गोळी राज चंडेश्वर त्रिभुवन कीर्ती, कालकूट, महाज्वरांकुश, विश्वताप हरण यापैकीं मिळेल ती मात्रा द्यावी. गुण चांगला येतो.

४ कडू निंबाच्या पंचांगाचें सत्व २ गुंजाभार व त्यांत मिऱ्याचें चूर्ण १ गुंजभार घालून द्यावें. पाण्यांतून किंवा लिंबाच्या सरबतांतून देणें. हें सत्व चांगलें असून तापावर व कृमिजन्य विषावर उत्तम आहे. आणि कोयनेलचे दोष याचें अंगीं नाहींत हें सर्व प्रकारें निर्दोष आहे.

५ कडूनिंबाचें पंचांग ( साल, पान, फूल, फळ, ळ ) २ तोळे, मिरें २० दाणें, ओवा, डाळिंबाची ाल, खुरासनी ओंवा, घणें, सुंठ, पावपाव तोळा र्वांचा काढा करून गाळून ठेवावा. काढ्यांत पाणी ८० तोळे घालून अष्टमांश उरवावा. २ तोळे प्रमाणें २।२ तासांनीं द्यावा. अथवा काढा न करितां त्यांतच हिंग पाव तोळा घालून चूर्ण करून मधांतून किंवा पाण्यांतून दर वेळीं अर्धा तोळा द्यावें. पथ्य कणेरी अळणी, ताक, निवालेलें ऊन पाणी, साळीच्या लाह्याची पेज किंवा मंड द्यावा. ( उत्तम उपाय )

६ धूप–कडूनिंबाची वाळलीं पानें, गुग्गूळ, राळ बिबा सर्व एकत्र करून त्याचा धूप रोग्याच्या खोलींत द्यावा.

७ टिंचर आयोडाईन दर २।३ तासांनीं २।२ थेंब घालून पाण्यांतून पाजावें. व गांठीस वरचेवर आयोडाईन लावावें. हें अनुभविक आहे यानें रोगी खात्रीनें बरा होतो. ( डॉक्टरी उपाय )

८ प्लेगाच्या सांथींत दररोज कडूनिंबाच्या सालीचा रस किंवा सालीचा काढा पीत असावें म्हणजे प्लेगच होत नाहीं व झाल्यास मरत नाहीं हे मी खात्रीनें सांगतों. प्रतीति पहावी. ( स्वतःचा अनुभव )

९ गांठीवर लेप–बिबा, घरोसा, चुना, गूळ सर्व वलून लेप द्यावा

१० गांटीवर लेप–कोरफडीचा गर हळद घालून ऊन करून गांठीवर वरचेवर लेप द्यावा.

११ इग्निशिया बी यास अरबी व हिंदी भाषेंत 'पपीता' म्हणतात. पपीता ही कुचल्याच्याच ातीची एक बी आहे. पण कुचल्यापेक्षां ही अधिक रदार आहे ही हिंदुस्थानांत कोचीन, त्रावणकोर थें पुष्कळ उत्पन्न होते. पपीत्याचें झाड वेलाप्रमाणें सतें. फळें फड्या निवडुंगाप्रमाणें असून त्यांत २४ ा असतात. पपीत्याची बी पांगऱ्याच्या बीं प्रमाणें ते, पण काळसर असते. बरेच लोक ही बी च्या दिवसांत बांधीत असतात पण गुण नाहीं.

१२ कडूनिंबाच्या सालीच्या काढ्यांत श्रीमल्ल रसायन दर खेपेस ३।४ वेढे उगाळून मध घालून ३।३ तासांनीं द्यावें. पथ्य दूध भात. तेल, तिखट, आंबट वर्ज. हें सर्वांत उत्तम औषध आहे.

१३ प्लेगाच्या गांठीस––बिब्याचे पाताळ यंत्रानें तेल काढून तें प्लेग गांठीवर पैशा एवढ्या जागीं लावावें. म्हणजे गांठ फुटून वेदना कमी होतात. मग जखमेचे मलम लावून बरें करावें. किंवा धोत्र्याचीं फुलें व अफू वांटून लेप द्यावा.

१४ नुसत्या पाण्याच्या अष्टमांश काढ्यांतून किंवा कडूनिंबाच्या सालीच्या काढ्यांतून मृत संजिवनी गोळी उगाळून गुंज प्रमाण ३।३ तासांनीं द्यावी. ज्यांत वात लक्षण जास्त आहे अशा वेळीं उपयोग करावा.

१५ तुळशीचीं पानें, द्रोण पुष्पीचीं पानें, मिरीं, पिंपळी प्रत्येकीं १।१ तोळा, कापूर ३ मासे घेऊन कडूनिंबाच्या काढ्याच्या रसांत किंवा पाल्याच्या रसांत खलून ४।४ गुंजा वजनाच्या गोळ्या बांधून दर वेळीं १ गोळी द्यावी. ज्वराचा वेग कमी होतो.

१६ तिळवणीचे झाडासह वाटून वडी करून ज्या बाजूस प्लेगाची गांठ असेल त्या बाजूच्या हाताच्या नाडीवर वडी ठेऊन वर पैसा बसवून फडक्यानें घट्ट बांधावें. २।३ तासांनीं सोडावें फोड येतो तो सुईनें फोडून पाणी वाहूं द्यावें. नंतर जखमेस तूप लावावें. गांठ बसते. व रोगी बरा होतो. हा एक सोपा उपाय आहे.

१७ उत्तम दगडी चुना चिंचोक्या एवढा व तितकेंच घट्ट साजूक तूप याची गोळी करून तासातासांनीं १।१ गोळी अशा ३ गोळ्या द्याव्या. तापाचा वेग जास्त असल्यास २।३ पर्यंतही दर खेपेस द्याव्या. दि. ३ गांठीवर बिब्याचें तेल लावावें. तेल काढण्याची कृति–बिब्बे फोफाट्यांत घालून ऊन झाल्यावर एका तव्यांत ठेऊन त्यावर दुसरा तवा उताणा ठेऊन जोरानें दाबावा अथवा तव्यावर

प्रमाणें उभे राहून दाबावें, व फिरवावें तेल निघेल तें कुपींत ठेवावें.

१८ फड्या निवडुंगाचें ( नागफडी ) पान भाजून आंतील गर प्लेगचे गांठीवर बांधावा. गांठ बसते किंवा विरघळते.

१९ सहा मासे काळा गोळ व सहा मासे अफूचें मिश्रण पाण्यांत खलून गरम करून त्याचा गांठीवर लेप द्यावा. २।३ लेपांत गांठ विरघळते.

## ५४ सर्व प्रकारच्या ज्वरावर उपाय.

१ अडुळशाच्या पिकल्या पानाचा रस १ तोळा काढून त्यांत १ गुंज कस्तुरी घालून द्यावा. सर्व ज्वर जातील.

२ कसल्याही ज्वरात–कुचल्याची बी भिजवून कातरून वाळवून तुपांत भाजून चूर्ण करून १ गुंज भार घेऊन विड्याच्या पानांतून द्यावी.

३ ज्वरांत वायु होतो त्यास–एक तोळा ओंवा घेऊन त्याचा अष्टमांश काढा करून त्यांत सराटयाच्या पाल्याचा रस १ तोळा, घालून पाजावा. वायु उतरतो, बडबड रहाते. अथवा ओंवा रात्रीं ताकाच्या निवळींत भिजत घालून सकाळीं वाळवून सडून आंतील दाणे काढून निवळींतच खलून बोरा एवढी गोळी करून मधांतून किंवा गुळांतून खावी.

४ विष्णुक्रांतीचा रस २ तोळे काढून साखर घालून द्यावा. सर्व ज्वर जातात.

५ ज्वरास युनानी गोळी–गज पिंपळी १ तोळा पिंपळमोड १ तोळा गजग्याचें बी १ तोळा बाभळीचा पाला ९ तो. सर्व चूर्ण बडीशेपाच्या काढ्यांत खलून गजग्या एवढ्या गोळ्या करून सर्व तापावर

[illegible] गाईच्या दुधांत ३ दिवस भिजत [illegible]ण्यानें धुवून घ्यावी. दूध नित्य नवें घालावें. सोन कावेच्या निमे सुंठ घालून विड्या[illegible] पानाच्या रसांत खलून वालप्रमाणें गोळ्या क[illegible] अनुपान–विडा, आल्याचा रस, खडी साखर ग[illegible] दूध, मध, तूप यांतून प्रकृति मान पाहून यो[illegible] साध्या ज्वरास व लहान मुलांस योग्य आहे.

७ सर्व ज्वरास व जीर्ण ज्वरास–सुंट, मनु[illegible] बडीशेप, लवंगा दालचिनी, खडी साखर, आ[illegible] काठी, खारीक, जेष्टमध, पाव पाव तोळा घे[illegible] अष्टमांश काढा करून द्यावा. दि. ७

८ कोरफडीची दळदार मोठीं २ पानें चि[illegible] त्यांत हळद, जिरें, कुटकी १।१ तोळा चूर्ण क[illegible] घालून त्यांत जोंधळे अर्ध तोळा घालावें. त्या[illegible] फडकें गुंडाळून मात कापड करून रानशेण[illegible] भाजून निवाल्यावर आंतील गरासुद्धा औषध वा[illegible] ६ भाग करून रोज १।१ भाग सकाळ संध्याक[illegible] पाण्यांत कालवून त्यांत गारगोटी तापवून विझव[illegible] पाजावा. ३ दिवसांत कसाही ज्वर जातो.

९ आमज्वरास–हिरडा, सुंठ, भुईतरव[illegible] ह्यांचा काढा साखर घालून ३ दिवस द्यावा. कसा[illegible] आमज्वर जातो.

१० सर्व ज्वरास अंजन–कावळ्याची विष्ठ[illegible] प्रेताच्या काष्टाचा कोळसा, समान खलून डोळ्यां[illegible] अंजन करावें. म्हणजे ज्वर, भूतज्वर, पिशाचबाध[illegible] डाकिनी, दृष्टिज्वर जातात.

११ भूनिंब ( काडे चिराईत ) इंद्रजव, वावडिं[illegible] नागरमोथ, सुंठ, लवंगा, जेष्टमध, पळसपाप[illegible] विष्णु क्रांत, गुळवेल, पित्त पापडा, कडू पडवळ[illegible] मनुका, खारीक, बेदाणे समभाग घेऊन अष्टमां[illegible] काढा करून द्यावा रात्रीं निकाढा द्यावा. हा ज्वरा[illegible] फार उत्तम आहे.

१२ ज्वरामृत वटि–शुद्ध बचनाग, मिरें, अक्क[illegible] खार, लवंगा समभाग चूर्ण करून विड्याच्या पानाच्या रसांत खलून गुंज प्रमाण गोळ्या कर[illegible] लवंग चूर्ण, विडा, किंवा आल्याचा रस[illegible] १ द्यावी.

१३ साधारण ज्वरास तोडगा—रविवारी निर्गुंडी किंवा सह देवीचें मूळ आणून कमरेस बांधावें ज्वर जातो.

१४ सिद्धौषधि–कवड्या ऊद ३ तोळे, सोन काव १ तोळा, केशर ६ मासे, उन्हांत ठेऊन बारीक खल करावा व औषध कुपींत भरून ठेवावें. लहान मुलांस १॥ मासा तुपांतून एक गुंजभार देणे. थोरास २।३ गुंजाभार द्यावें.

१५ अधर वेलीची, पिंपळाच्या सालीची, दूर्वाची राख समान घेऊन १ तोळा घेऊन मधांतून द्यावी.

१६ रुईच्या पानाच्या दोन पत्रावळी करून त्यांत जाईचा पाला बचकभर घालून त्यावर पिंपळी १ तो. फूल काढून लवंगा १ तोळा याचें चूर्ण पसरावें. त्यावर पुन: जाईचा पाला घालून दुसरी पत्रावळ झांकून गुंडाळी करून त्यावर ३ मात कपडें करून गोंवऱ्याची आंच देऊन २ मात कापडें जळल्यावर काढून आंतील पत्रावळी शिवाय बाकीचीं औषधें काढून वाटून वालप्रमाणें गोळ्या करून १।२ गोळ्या आल्याचा रस, खडीसाखर यांतून ज्वर पाहून द्याव्या.

१७ ज्वरावर तोडगा—शनवारीं अघाड्याच्या झाडास पांढऱ्या सुताचे ३ फेरे देऊन व विडा ठेऊन दुसरे दिवशीं सकाळीं शुचिर्भूत होऊन कोणाशीं न बोलतां व सावली न पाडतां अघाड्याची मुळी आणून गुंडाळलेल्या सुतानेंच ज्वरी मनुष्याच्या गळ्यांत बांधावी. एक दिवसाआड येणारा ज्वर जातो. याच प्रमाणें थोर चिकण्याची मुळी बांधली तरी गुण येतो.

१८ सर्व ज्वरास मस्तकावर लेप–किराईत, मीठ, [सुं]ठ, कोष्ठ, चंदन, वाळा, सर्व पाण्यांत वाटून मस्त-[कास] लेप करावा. सर्व ज्वर जातात.

१९ सर्व ज्वरास अंजन—हिंग, कडूलिंबाचें बीं, [काळ्या] सापाची कात, हीं गाढवाच्या मुतांत खलून [अंजन करा]वें. सर्व ज्वर जातात.

२० कोणताही ज्वर, दमा, श्वास, [खो]कला श्रीमल्ल यांस-चिमणीचें कोटें (चिमण्यांनीं विणून [केले]लें घर) जाळून राख करून एक चिमटीभर मधांतून चाटवावी. दि. ३।७ इटकून गुण.

२१ ज्वरास कल्क–निर्गुडीचा पाला, कडूनिंबाचा पाला, गजग्याचा पाला, हे पाणी घालून कुटून रस काढून त्यांत जिऱ्याची पूड घालून त्यांत जुनी विट-कर तापवून विझवावी. व निवाल्यावर पाजावें. थोरास २ पासून ५ तोळे. लहानास १ तोळा. दि. ३।७

२२ कृमिजन्य ज्वरास—कडूकारळे, कुटकी, काडेचिराईत, डिकेंमाली, सुंठ, पादेलोण, समभाग चूर्ण करून सकाळीं व रात्रीं अर्ध तोळा चूर्ण थंड पाण्यांतून द्यावें. अथवा पाण्यांत कालवून त्यांत लोखंडी पळी तापवून बुडवून गाळून पाजावें. दि. ३।७ लहान मुलास व जंताचें ज्वरांस चांगले.

२३ पंचाननरस-शुद्ध बचनाग २ भाग, मिरें ४ भाग, शुद्ध गंधक २ भाग, शुद्ध हिंगूळ १ भाग, ताम्रभस्म १२ भाग, सर्व रुईच्या चिकांत खलून उडदा येवढ्या गोळ्या कराव्या. दर वेळीं १ गोळी मधांतून द्यावी. पथ्य दूध भात सेंधेलोण, खडीसाखर, थंडपाणी.

२४ महाज्वरांकुश–पारा, गंधक, बचनाग, हीं शुद्ध १।१ तोळा, शुद्ध धोत्र्याचें बीं ९ तोळे, चोक (पिसोळा किंवा कांठे धोत्र्याचें मूळ) सर्वांच्या दुप्पट घेऊन सर्व वस्त्रगाळ चूर्ण करून जंबीराच्या रसांत १ दिवस व आल्याच्या रसांत १ दिवस खलून वाल प्रमाण गोळ्या करून एक गोळी आल्याच्या रसांतून द्यावी. ह्मणजे त्रिदोषापासून जो ज्वर येतो तो, व दिवसां रात्रीं २ वेळां येतो तो, व एक दिवसा आड येतो तो व चातुर्थिक हे सारे जातात. हा विषम ज्वरावर उत्तम आहे.

२५ ज्वर मुरारि–शुद्ध [...] [खल]ल्यांत घालून ऊन लिंबू रसाचीं २१ पुटें देऊन नंतर दुसरा तवा गाईच्या लोण्यांत खल करावा. व दर [त]वा तव्यावर

प्रमाणें साखरेंतून द्यावा. ह्मणजे सद्याज्वराचा नाश होतो.

२६ सुवर्ण मालिनी वसंत–सोन्याचा वर्ख किंवा कीस १ तोळा, मोत्याचा चुरा २ तोळे, मिरीं ३ तोळे, उत्तम शुद्ध कलखापरी ८ तोळे सर्व वस्त्रगाळ चूर्ण करून प्रथम २॥ तोळे लोण्यांत चांगलें खलून नंतर लोणी नाहींसें होई पर्यंत ( ओशटपणा जाई पर्यंत ) लिंबू रसांत खलावें. त्यांत लोण्याचा ओशटपणा अगदीं राहूं नये. हा २ गुंजाभार मध, पिंपळीतून द्यावा. ह्मणजे जीर्णज्वर, धातुगतज्वर, आतिसार, क्षय, पांडु, पित्तविकार, नेत्रविकार, बाळंतरोग, अस्तिज्वर, श्वास, कास, वगैरे जातात.

२७ लघु सूचिकाभरण सन्निपातावर–शुद्धबचनाग ४ तोळे, शुद्ध पारा ३ मासे घेऊन २ प्रहर खलून दोन मातीचे भाजलेले पेले घेऊन त्यास आंतल्या बाजूस कांचेचा पूड बारीक अशी पाण्यांत खलून लावावी तो वाळल्या नंतर औषध घालावें. व दुसरा पेला वर झांकुन सांध्यावर मात कापड करून वाळल्यावर चुलीवर ठेऊन हलका अग्नि २ प्रहर द्यावा. वरल्या पेल्यावर पाण्याच्या घड्या वरचेवर ओल्या ठेवाव्या. नंतर खालीं उतरून निवाल्यावर मात कापड काढून युक्तीनें वरल्या पेल्यास पारा लागलेला असतो तो काढून स्वच्छ कुपींत भरून ठेवावा. सन्निपातांत मूर्छा आल्यास वस्त्र्यानें टाळूचे केस काढून सुईच्या अग्रावर राहील इतका पारा ताळूस फासणी मारून रक्त काढून त्यांत घालून बोटानें रक्तास मिळेपर्यंत चोळावें ह्मणजे तत्काळ सावध होतो. मूर्छा दूर होते. तसेंच सर्पदंशानें मूर्छा येऊन आसन्नमरण झालेला मनुष्यही या उपायानें सावध होतो. अंगाचा दाह झाल्यास गुलकंद, डाळिंब, द्राक्षें इत्यादि खाण्यास द्यावीं. दाह शांत होतो.

... मदमरारी रस–तरूण व आमज्वरावर शुद्ध ...स्म, लोहभस्म, अभ्रकभस्म, ...मभाग घेऊन त्याच्या निम्मे बचनाग ...ा एकच खल करून कुपींत ठेवावा. आल्याच्या रसांतून गुंजभार द्यावा. ह्मणजे तरूण व आमज्वराचा नाश होतो.

२९ बालार्क रस–पारा, गंधक, हिंगूळ, जेपाळ, समभाग शुद्ध घेऊन दांती मुळाच्या काढ्यांत खलून दोन गुंजा वजनाच्या गोळ्या करून १ गोळी भक्षण केली ह्मणजे एक दिवसांत ज्वर जातो. अनुपान आल्याचा रस, किंवा साखर किंवा गूळ योजावा.

३० त्रिभुवन कीर्तिरस–शुद्ध हिंगूळ, बचनाग, सुंठ, मिरे, पिंपळी, टांकणखार व पिंपळमूळ हीं सर्व औषधें चूर्ण करून त्याला तुळस, आलें, व धोत्रा यांच्या रसांत एकेक दिवस निरनिराळे खलून एक गुंज प्रमाण गोळ्या कराव्या. सकाळ व संध्याकाळ एकेक गोळी आल्याच्या रसांतून द्यावी. अथवा ज्वरोक्त काढ्यांतून द्यावी. म्हणजे सर्व ज्वर, १३ प्रकारचे सन्निपात नाश पावतात.

३१ काशाच्या किंवा रुप्याच्या पात्रांत आतिशय गारपाणी घालून भांडें छातीवर, मस्तकावर, व कानशिलेवर ठेवावें ( फिरवावें ) पाणी ऊन झाल्यास ते फेंकून पुन्हा दुसरें घ्यावें याप्रमाणें १ घटका केल्यास बराच गूण येतो. १०५ अंश ताप असला तरी भिण्याचें कारण नाहीं. जेथें बर्फ मिळत नाहीं, तेथें हा उपाय सोपा असून बर्फाचें काम करितो. व झोंप न आल्यास व हाता पायाच्या आगीस असेंच करावें.

३२ मृतप्राणदायीरस–पारा, गंधक, टांकणखार-बचनाग धोत्र्याचें बीं सर्व समभाग शुद्ध घेऊन त्यास धोत्र्याच्या बियाच्या व बचनागाच्या काढ्याच्या ३।३ भावना द्याव्या. नंतर सुंठ, मिरें, पिंपळी ह्यांच्या काढ्याच्या ५ भावना द्याव्या. ह्मणजे तयार झाला. हा सन्निपातज्वर, नूतनज्वर, मोठा कफरोग ह्यांस १ गुंज प्रमाण आल्याच्या रसांत द्यावा. पथ्य दूध भात, दहीं भात, खीर, ताकभात खावा. आणि ज्वरातिसार, आमातिसार, संग्रहणी, मूळव्याध यांस मध साखरेंतून द्यावा. वातज्वर, प्रकंपवात, बाहुकं... एकांगवात, यांस सुंठ, मिरें, पिंपळी, चित्रक ... काढ्यांतून द्यावा आणि अपस्मार उन्मादा...